# ख्रिस्ती शास्त्रांतल्या कथा.

जुन्या कराराच्या.

# BARTH'S BIBLE STORIES.

## OLD TESTAMENT.

TRANSLATED INTO MARATHI.

Bombay Tract and Book Society.
1,500 Copies. A. D. 1851.

मुंबईमध्यें अमेरिकन मिशन छापखान्यांत छापिलें.

सन १८५१.

Price, Four Annas. किम्मत चार आणे.

Barth, Christian Gottlob

# ख्रिस्ती शास्त्रांतल्या कथा.

जुन्या कराराच्या.

✓

# BARTH'S BIBLE STORIES.

## OLD TESTAMENT.

C13

TRANSLATED INTO MARATHI.



BOMBAY TRACT AND BOOK SOCIETY.
1,500 COPIES. A. D. 1851.

मुंबईमध्यें अमेरिकन मिशन छापखान्यांत छापिलें.
सन १८५१.

Bauer

# अनुक्रमणिका.

## अनुक्रमणिका.

# अनुक्रमणिका.

# ख्रिस्ती शास्त्रांतल्या कथा.

---

जुन्या कराराच्या.

---



## गोष्ट १. उत्पत्ति.

ईश्वराने आपल्या शब्द मात्राने आकाश आणि पृथ्वी उत्पन्न केली; आणि हीं सर्व एकदांच व्हावीं, असें नाहीं, उतरोत्तर व्हावी असी ईश्वराची इच्छा होती; कारण कीं त्याने पूर्वींपासूनच सर्व वस्तूंचे समुदाय, आकार आणि प्रमाण याविषयीं ठरविलें होतें.

ईश्वरानें साहा दिवसांत पृथ्वी आणि आकाश निर्माण केलें त्याविषयीं ऐका.

ईश्वर बोलला कीं "उजेड होवो." मग उजेड झाला. ईश्वराने उजेड व काळोख यांस वेगळें वेगळें केलें. तेव्हां पहिला दिवस व पहिली रात्र झाली.

नंतर ईश्वराने पृथ्वीच्या सभोंवतें जें अंतराळ तें निर्माण केलें. आणि अंतराळाखालील जें पाणी आणि अंतराळावरील जें पाणी त्यांस वेगळें वेगळें केलें. तेव्हां देवाने अंतराळाला आकाश ह्मदलें. हें कृत्य दुसऱ्या दिवसीं झालें.

तिसऱ्या दिवसीं ईश्वराने पृथ्वीवरील जमीन पाण्यापासून निराळी केली; आणि त्याने गवत व हिरवळ व फळझाडें पृथ्वीवर उगवावीं असें केलें.

चवथ्या दिवसीं ईश्वराने आकाशमंडळांत ज्योती निर्माण केल्या. पृथ्वीस खुणा, ऋतु, आणि दिवस व वर्षें दाखविण्यासाठीं देवाने त्या केल्या. त्याने जी मोठी ज्योती ती दिवस चालवायासाठीं आणि जी लहान ज्योती ती रात्रि चालवायासाठीं केली, आणि तारेहि केले.

पांचव्या दिवसीं ईश्वराने माहान मासे व जे जे प्राणी उदकांत चलनवलन करितात ते व सर्व प्रकारचे पक्षी हे सर्व निर्माण केले. आणि यांस ईश्वराने असा वर दिल्हा कीं तुह्मी सफळ होऊन वाढा.

साहाव्या दिवसीं ईश्वराने पृथ्वींतील सर्व श्वापदें व गुरें आणि कीडमुंग्या आपआपल्या जातीप्रमाणें उत्पन्न होत असें केलें. नंतर ईश्वर बोलला कीं आह्मी आपल्या प्रतिछायेप्रमाणें आपल्या प्रतिमेसारिखें माणूस उत्पन्न करूं; आणि तीं समुद्रांतील मास्यांवर व आकाशांतील पांखरांवर व पशूंवर व सर्व पृथ्वीवर व पृथ्वीवरल्या प्रत्येक वळवळणाऱ्या जंतूंवर धनीपण करोत.

या प्रकारें ईश्वराने आपल्या प्रतिछायेप्रमाणें मनुष्यास

उत्पन्न केलें. त्याने एक पुरुष व एक स्त्री उत्पन्न केली; आणि त्यांस देव असें म्हणाला कीं तुम्ही सफळ होऊन वाढा आणि पृथ्वी भरा आणि तिला जिंकून सर्व जिवांवर धनीपण करा.

हें सर्व कृत्य साहाव्या दिवशीं झालें. तेव्हां देवाने जें अवघें उत्पन्न केलें त्याला न्याहाळिलें, आणि पाहा तें फार उत्तम होतें.

आतां ईश्वराने सातव्या दिवशीं काय केलें तें पाहा. आम्ही त्यांत विसावा घ्यावा म्हणून त्याने विश्रांतीचा दिवस नेमला कारण कीं त्याने जें सर्व केलें होतें त्यापासून तो त्या दिवशीं थांबला आणि ईश्वरानें त्या सातव्या दिवसाला आशीर्वाद दिल्हा आणि त्याला पवित्र केलें कारण कीं तो त्यांत आपलें सर्व जें उत्पत्तीचें काम त्यापासून स्वस्थ राहिला.

सातव्या दिवसास शाबाथ म्हणजे विश्रांतीचा दिवस असें म्हटलें. हा विश्रांतीचा दिवस मनुष्यास फार हितावह आहे अणखी मनुष्यासाठीं जे पशू मेहेनत करितात त्यांसहि हा फार सुखकारक आहे. विश्रांतीचा दिवस नेमल्याने आपणावर ईश्वराची ममता आहे हें पक्केपणीं समजतें, ‘त्याची कोमळ दया ही त्याच्या सर्व कृत्यांत अढळती.’

परमेश्वराने सृष्टि उत्पन्न करून आणि आजपर्यंत सृष्टीचा संभाळ करून आपली शक्ति चातुर्य व चांगुलपण दाखविलें आहे, तर त्या गुणाविषयीं शाबाथ दिवशीं आपणास स्मरण पडूं नये काय? होय खचीत स्मरण पडावें. आणि परमेश्वराने आपला प्रिय पुत्र जो प्रभु

येशू ख्रीस्त त्याच्या योगानें जो तारणोपाय अनंत कृपेनें केलेला आहे त्याचेंहि स्मरण त्या दिवसीं पडावें. आणि मनुष्यें भ्रष्ट व अपराधी असतां आकाशलोकीं जाऊन सर्वकाळीक विसावा घ्यावयास योग्य नाहींत ह्मणून परमेश्वर येशू ख्रीस्ताकडून त्यांच्या अंतःकरणाचा पालट करीत आहे, ही त्याची नवीन उत्पत्ति आहे, तर याविषयींहि शाबाथ दिवसीं स्मरण करणें हें आह्मास योग्य आहे.



## गोष्ट २. आज्ञाभंग.

ईश्वरानें त्या पुरुषास एक्या सुंदर बागेंत राहावयास जागा दिली तेथील सर्व जातींचीं झाडें दिसण्यांत रमणीय आणि त्यांचीं फळें खायाला उपयोगी पडत असीं होतीं. या बागाच्या मध्यभागीं दोन विशेष झाडें होतीं, त्यांचीं नावें एक जीवताचें झाड, दुसरें बरें वाईट जाणण्याचें. या दोहोंतून जें बरें वाईट जाणण्याचें होतें

त्याचीं मात्र फळें खाऊं नये, वरकड पाहिजे त्या झाडाचीं फळें खावीं परंतु मना केलेल्या झाडाचीं फळें जर तूं खाल्लींस तर तातकाळ मरसील असें ईश्वराने आदामास स्पष्ट सांगितलें होतें.

सर्प मोठा ठक होता, त्याने आदामाच्या स्त्रीस विचारिलें, "बाई, खरेंच काय ? ईश्वराने तुह्मी या बागांतील कोणत्याहि झाडाचीं फळें खाऊं नका असें सांगितलें आहे. हें ऐकून त्या स्त्रियेने उत्तर केलें कीं कोणत्याहि झाडाचीं फळें खाऊं नका असें सांगितलें नाहीं परंतु बागेच्या मध्यभागीं जें झाड आहे त्याचीं फळें खाऊं नये व त्यांस स्पर्श देखील करूं नये एवढेंच सांगितलें आहे. आणि दुसरें ह्मणाला कीं ही माझी आज्ञा उल्लंघन केली तर मरालच मराल. नंतर तो साप पुन्हां स्त्रीस बोलला कीं मी आपणास खरें सांगतों, त्या झाडाचीं फळें आपण खाल्लीं असतां मरण पावाल असें नाहीं; ईश्वराने खाऊं नको ह्मणून सांगण्याचें कारण निराळेंच आहे, तें हें कीं जर तुह्मी ह्या झाडाचीं फळें खाल्लीं तर तुमचीं ज्ञानचक्षू उघडतील आणि देवाप्रमाणें तुह्मास बरें वाईट समजूं लागेल. हें त्या सर्पाचें भाषण ऐकून स्त्रीला असें दिसलें कीं त्या झाडावरचें खाणें चांगलें आणि दृष्टीस सुंदर आणि शाहाणें करण्यासाठीं आवडतें झाड; तेव्हां तिने त्याचें कांहीं फळ घेऊन खाल्लें, व आपल्या नवऱ्यालाहि दिल्हें, आणि त्याने खाल्लें. येणेंकरून त्या उभयतांचीं ज्ञानचक्षु उघडलीं आणि त्यांस वाटूं लागलें कीं आपण नग्न आहों यास्तव आप-

त्यास परिधान करण्याकरितां कांहीं तरी पाहिजे असा विचार मनांत आणून त्या उभयतांही कांहीं अंजिराचीं पानें टांचून आपणास परिधानें केलीं.

इतक्यांत प्रभु थंडवेळीं बागांत फिरत असतां त्याची वाणी त्या उभयतांच्या कानीं पडली, तेव्हां तीं दोघें जणें झाडामध्यें लपालीं. तेव्हां ईश्वराने आदामास हाक मारिली आणि विचारिलें कीं तूं कोठें आहेस ? तें ऐकून आदामाने उत्तर दिल्हें कीं मी तुझा शब्द ऐकिला आणि मी नागवा यास्तव झ्यालों आणि लपालों. ईश्वर बोलला तूं नागवा असें तुला कोणी सांगितलें ? मी मना केलेल्या झाडांचीं फळें त्वां खाल्लीं कीं काय ? नंतर आदाम बोलला आपण मला जी स्त्री सोबतीकरितां दिल्ही तिने त्या झाडाचीं फळें मला दिल्हीं आणि मी खाल्लीं, हें ऐकून देव त्या स्त्रियेस बोलला, हें त्वां कां केलें? तिने उत्तर केलें कीं मला या सर्पाने मोहांत पाडिलें ह्मणून मी असें केलें.

या उपरांत त्या सर्पास देव बोलला अरे सर्पा त्वां हें केलें आहे ह्मणून तुझी अवस्था सर्व गुरें ढोरें व इतर पशु यांपेक्षां फार वाईट होईल; तुला पोटाने चालावें लागेल, आणि सर्वकाळ मृत्तिका खाऊन राहावें लागेल, आणि तूं व ती स्त्री या तुह्मामध्यें आणि तुझें संतान व तिचें संतान यांमध्यें परस्परें मी वैर ठेवीन, तें तुझें मस्तक फोडील आणि तूं त्याची टांच फोडसील.

ज्याविषयीं ईश्वराने वचन दिल्हें तो अविनाशी येशू ख्रिस्त मानावा. तो देहधारण घेऊन या जगांत पातक्यांस तारण्याकरितां येणार असें त्यावेळेस दाखविलें

होतें. मनुष्याकडून मानभंग झाला हें पाहून सैतानास फारच आनंद कदाचित झाला आणि त्याला वाटलें असेल कीं आपण देवाच्या बेताचा पाडाव केला. आपला नाश व अप्रतिष्ठा करावयास व परमेश्वराचें गौरव करावयास स्त्रियेच्या पोटीं परमेश्वराचा पुत्र जन्मास येईल, असें कांहीं सैतानाला वाटलें नसेल.

नंतर त्या स्त्रियेस देव बोलला, “ तूं गर्व्हार अससील तेव्हां तुला फार दुःख सोसावें लागेल आणि भ्रताराच्या आज्ञेंत वागावें लागेल.

आणि मग आदामास बोलला तूं स्त्रीची गोष्ट मानून माझी आज्ञा उल्लंघन केलीस ह्मणून तुझ्यामुळें भूमि शापित आहे; ती तुझ्यासाठीं कांटळ व कुसळ वाढवील; मेहेनत केल्यावांचून तुला खावयास मिळणार नाहीं; आणि याप्रमाणें भक्षण मिळविण्याकारितां तुला मरणपर्यंत कष्ट करावे लागतील; कां कीं तूं माती आहेस आणि मातींत परत जासील.

यानंतर त्या मनुष्यास सुंदर भुवनांतून देवाने बाहेर हाकून लाविला आणि जिवनी झाडाची वाट राखायासाठीं दूतांचा पाहारा हातांत पाजीवलेल्या तरवारि देऊन ठेविला.

याप्रकारें जरी दयाळू देवाने आदाम आणि हाव्वा यांस सुंदर भुवनांतून हाकून लाविलें तरी त्याजवर तो कृपा ठेवी. त्यांस वस्त्राची गरज त्या काळाअगोदर रक्षणाकरितां अथवा आच्छादनाकरितां कधीं लागली नव्हती; आतां ईश्वराने चर्माचे आंगरखे केले आणि त्यांस पेहेरायास दिल्हे. कदाचित हीं चर्में अर्पिलेल्या

पशूंचीं होतीं. परमेश्वराने आदामाला अर्पण करण्याविषयीं या हेतुने नियम केला होता कीं तेणेंकडून येशू ख्रीस्त काळांतरीं आपला जीव लोकांच्या पापासाठीं अर्पणार, हें मनुष्यांच्या स्मरणांत राहावें.

---

## गोष्ट ३. बंधुहत्या.

आदामाच्या पुत्रांतून एकाचें नांव काईन आणि दुसऱ्याचें नांव हाबेल असें होतें. काईन शेतकरी होता आणि हाबेल हा मेंढपाळ होता. एके दिवसीं या दोहों भावानी प्रभूस अर्पण करण्यास्तव नैवेद्य आणिले; काईनाने जमिनीवरील धान्य आणिलें आणि हाबेल याने आपल्या कळपांतलीं प्रथम झालेलीं कोंकरें आणिलीं, आणि ईश्वराला हाबेलाचा नैवेद्य आवडला, काईनाचा तर आवडला नाहीं. कारण कीं हाबेल याने जो नैवेद्य आणिला तो विश्वासाचा होता. त्याच्या कोंकराच्या हवनाने ईश्वर हा सृष्टिकर्ता व सर्व चांगल्या वस्तूंचा उदारदाता एवढेंच त्याने मान्य केलें असें नाहीं; अणखी असें मान्य केलें कीं आपण नाश पावणारा व मानभंग केल्याने पापी व मरायास योग्य आहों, आणि जर पापी यास क्षमा प्राप्त होणें आहे तर ती अन्य पुरुषाच्या मरणाने प्राप्त होईल. काईन हा कठीण हृदयाचा अविश्वासू व अभिमानी असा होता; ईश्वराला जसें हवन द्यावयाचें तें करून आपण पापी आहों असा तो त्याजवळ कबूल झाला नाहीं; तर ईश्वराची जी त्याजवर अवकृपा झाली ती यथार्थ झाली. मग काईनास फार राग आला आणि त्याचें तोंड उतरून गेलें. असें पा-

हून प्रभु ह्मणाला कीं तुला राग कशासाठीं आला? आणि तुझें तोंड कां उतरलें? जर तूं चांगलें केलेंस तर मला तूं आवडणार नाहींस कीं काय? आणि जर तूं चांगलें नाहीं केलेंस तर दारासीं पाप राहिलें आहे.



मग काईन हाबेल याजपासीं बोलूं लागला. हे बंधु उभयतां शेतांत असतां काईनानें अकस्मात उठून आपल्या बंधूस ठार मारिलें. नंतर प्रभु काईनास विचारूं लागला कीं तुझा बंधू हाबेल कोठें आहे? काईन ह्मणाला कीं मला ठाऊक नाहीं मी आपल्या बंधुचा रक्षक आहें काय? नंतर प्रभु बोलला कीं हें तूं काय केलेंस? तुझ्या बंधूच्या रक्ताची ध्वनि भूमींतून माझ्या कानीं येत आहे. यास्तव ज्या भूमीवर तुझ्या हातून तुझ्या बंधूचा वध होऊन रक्तश्राव झाला आहे तिजविषयीं तुला श्राप असो; जेव्हां तूं जमिनीवर लागवड करसील तेव्हां तुला तिजवरील पीक प्राप्त होणार नाहीं व पृथ्वींत तूं पळपट्या व भटकणारा असा अससील. मग काईन बोलूं लागला कीं मला सोसण्याच्या शक्तीपेक्षां अधिक शासन झालें आहे, आणि ज्याच्या ज्याच्या मी दृष्टीस पडेन तो तो म-

जवर हात टाकील. असें ऐकून प्रभु ईश्वर ह्मणूं लागला कीं तुजवर कोणी हात टाकूं नये ह्मणून मी एक खूण करितों. नंतर काईन कुटुंबासहवर्तमान ईश्वराजवळून निघून दूर जाऊन त्याने एक नगर बांधिलें आणि त्या नगरास आपल्या पुत्राचें नाव ईनाक हें दिल्हें. ही जेव्हां गोष्ट घडली तेव्हां आदामाचें वय १२३ वर्षांचें होतें. आणि त्याच्या स्त्रियेस एक दुसरा पुत्र झाला. त्याचें नाव सेथ ह्मणजे हरवलेल्याच्या बदल नेमलेला असें तिने ठेवलें. आपण काईनाचे गर्व व मत्सर यामुळें काय नाशकारक परिणाम घडले याविषयीं विचार करावा. आपणास एकादे वेळीं जर ईश्वराने असे अरिष्टाचे परिणाम चुकविले नसते तर सूड घेण्याचे विचार होऊन आपल्या हातूनहि कदाचित असा हत्या व रक्तस्राव झाला असता. अरेरे एकमेकावर रागें भरणें ही केवढी अनर्थाची गोष्ट आहे आणि काईनाप्रमाणें ईश्वरावर राग काढणें हें तर केवढें मूर्खपण. ईश्वर तुह्मास काईनाच्या घोर अपराधापासून रक्षो; आणि हाबेल याने जसा जगाच्या तारणारावर विश्वास ठेविला त्याप्रमाणें आम्हीहि विश्वास ठेवावा म्हणजे ईश्वराची मदत होईल आणि तो आमचा अंगिकार करील.

---

## गोष्ट ४. इनाक.

हाव्वा इला सेथ नामक एक पुत्र होता असें जें सांगितलें तें आपल्या स्मरणांत राहिलें असेल. तिला दुसरे देखील कित्येक मुलगे झाले परंतु त्याविषयीं लेख धर्मपु-

स्तकांत अगदीं नाहीं. हा वर सांगितला सेथ याजविषयींच धर्मपुस्तकांत लिहिण्याचें कारण हें आहे कीं मुख्यत्वेंकरून त्याच्या संतानानेच ईश्वराविषयीं खरी समजूत राखली आहे; व त्याच्याच कुळांत बहुत दिवसांनंतर कीर्तिमान सर्व जगत्राता जन्मणार होता. काईनापासून व मुळपुरूषाचे दुसरे कित्येक लेकरें, त्यांपासून जे वंशज, त्यांच्यायोगाने पापाचे परिणाम केवढें दुःखास्पद आहेत हें लवकर दाखविलें गेलें. ते ईश्वरास ओळखत नाहीं तसे झाले; यास्तव ईश्वराने त्यांची वास्तपुस्त सोडिली आणि त्यांस पापाचरणांत निमग्न असें राहूं दिल्हें.

यावरून दिसतें कीं प्राचीन काळींहि लोकांमध्यें दोन तऱ्हा होत्या; कोणी लोक प्रभूस भिऊन चालत व कोणी कांहीं भीति न धरितां वागत. आपला विश्वास वचन दिल्हेल्या तारणारावर आहे असें ज्याने सुआचरणाने दाखविलें, ती देवाची मंडळी जाणावी; याखेरीज बाकीचे लोक ते अविश्वासी व पातकी असे होते. असें म्हटलें आहे कीं सेथाचे वंशज विश्वास धरणारे असे पृथ्वीवर थोडेच होते, व त्या थोड्यांतूनहि कित्येक ज्या देवाला त्यांचे वाडवडील भजत त्या देवाला सोडून पातकी लोकांच्या मंडळींत शिरले. शास्त्रांत असें सांगितलें आहे कीं जेव्हां मनुष्याची संतती पृथ्वीवर फार वाढूं लागली तेव्हां कित्येकांस मुली झाल्या त्यांतून ज्या ज्या सुंदर होत्या त्यावरावर देवाच्या पुत्रांनी लग्न केलें.

परंतु ईश्वर मनुष्यमात्रावर आपल्या दयेचे बेत सिद्धीस जाण्यास्तव ज्यांची निष्ठा त्याजवर होती त्यानां आप-

ल्या मार्गांत राखी; व त्यांतून एक इनाक नामें करून आदामापासून सातव्या पिढिंतला होता तो पवित्र होता आणि देवासंगतीं चालला ह्मणून देवाने त्याला मरण दिल्यावांचून देहासुद्धां आकाश लोकांत नेलें; या नवलकारक गोष्टीने जगाचा तारणोपाय धर्मशील लोकांस व इतर जनांस पूर्वींपेक्षां उघड दिसून आला. असें त्यांनी जाणिलें कीं जे तारण पावतात त्यांचे आत्मे सत्गतीस जातील, एवढेंच नाहीं परंतु त्यांचीं शरीरें जीं नाशिवंत तीं दिव्य व अनाशिवंत होतील व मरणाधीन असतील तीं अमर होतील.

नव्या करारांत असें सांगितलें आहे कीं इनाकानें उपदेश केला तो याप्रमाणें कीं प्रभु यथान्यायें सर्व पापी व उन्मत्त यांस शासन करायास येणार आहे.



## गोष्ट ५. जगबूड.

सांप्रतच्या मनुष्यांपेक्षां पूर्वींचीं मनुष्यें शरीरानें सदृढ आणि दिर्घ आयुष्याचीं होतीं. आदामाचें वय

९१३० वर्षांचें होतें, आणि जेव्हां तो मरण पावला तेव्हां त्याचे वंशज सेथापासून ९ पिढ्या आणि काईनापासून १० पिढ्या असे झाले होते. त्यावेळीं मनुष्याचें आयुष्य बहुतकरून तसेंच दीर्घ होतें. मेथुसला ९६९ वर्षें वांचला आणि नोहा ९५० वर्षें वांचला. जी संतती आदामाच्या पुत्रापासून झाली तिची संख्या फार होती. त्यावेळीं जसी मनुष्यांची संतती वाढत चालली होती त्याप्रमाणेंच त्यामध्यें बळात्कार व दुष्टपणहि चाललें होतें.

आणि प्रभू बोलला कीं माझा आत्मा माणसासीं सर्वकाळ यत्न करणार नाहीं कारण कीं तोहि मास आहे; तथापि त्याचे दिवस एकशें वीस वर्षें होतील. त्यावेळीं मनुष्याजवळ धर्मपुस्तक ह्मणजे ईश्वराने दिल्हेलें शास्त्र नव्हतें, परंतु ईश्वर आपल्या आत्माच्या योगाने मनुष्यांची खातरी करीत असे.

आणि प्रभु असें बोलला कीं मी जो मनुष्य उत्पन्न केला आहे त्याचा मी पृथ्वीवरून नाश करून टाकीन.

परंतु त्यांतून नोहावर ईश्वराची कृपा होती कारण कीं नोहा सदाचरणानें चालत असे. आणि ईश्वराने नोहास सांगितलें कीं तूं ३०० हात लांब व ५० हात रुंद व ३० हात उंच असें तारूं कर (तें केवढें मोठें पाहा) आणि त्यांत मजले कर. कारण कीं मी पृथ्वीवर पूर आणून सर्व प्राणीमात्रांचा नाश करून टाकणार आहें आणि तुजसीं मात्र मी करार करितों. तुझी बायको व तुझे पुत्र व त्यांच्या बायका यांसहवर्तमान तूं तारवांत जा, आणि तूं जीवांतील प्रत्येक जातीचे दोघे दोघे आ-

पल्यां संगतीं त्यांचें रक्षण होण्यास्तव आणून ठेव; आणि सर्व खाण्याचे पदार्थ आणून ठेव; ह्मणजे तुझा व तुझ्या कुटुंबाचा व त्या प्राण्याचा निर्वाह होईल. देवाने नोहाला ज्या प्रत्येक आज्ञा दिल्ह्या त्यांप्रमाणें त्याने केलें.

जेव्हां नोहा तारवांत गेला तेव्हां त्याचें वय ६०० वर्षांचें होतें. मग पृथ्वीवर पाण्याचा प्रलय आला. मोठमोठाले खोल सागरांतील झरे फुटले गेले आणि आकाशाचे दरवाजे उघडून चाळीस दिवस सतत पर्जन्य पडला. जेव्हां पाणी पुष्कळ झालें तेव्हां नोहाचें तारूं त्या पाण्यावर तरूं लागलें. पृथ्वीवर इतकें पाणी वाढलें कीं मोठमोठाले डोंगर बुडून गेले व ते डोंगर बुडूनहि त्यांवर १५ हात पाणी चढलें. असें सर्व पाणी भूमीवर १५० दिवसपर्यंत ठांब राहिलें, मग थोडें थोडें कमी होऊं लागलें. द्वितीय महिन्याच्या दाहाव्या दिवसीं नोहा तारवावर चढला आणि त्याच महिन्याच्या १७ व्या दिवसापासून मोठमोठाले सागरांतील झरे उसळूं लागले. याप्रमाणें ईश्वराने नोहा आणि त्याचें कुटुंब याशिवाय सर्व मनुष्यांचा नाश केला.

तर अस्या भयंकर गोष्टीवरून ईश्वर न्यायी आणि दयाळुहि आहे हें स्पष्ट कळतें. असें लिहिलें आहे कीं त्यावेळीं पृथ्वीवर बळात्कार चालला होता. हा बळात्कार ईश्वराच्या भक्तांविरूद्ध केला यांत संशय नाहीं. यावरून असें कळतें कीं स्त्रियेच्या वंशजामध्यें आणि सर्पाच्या वंशजामध्यें वैमनस्य होईल,असें जें भविष्य तें पूर्ण होऊं लागलें. न्यायी व पवित्र सर्व वस्तूंचा कर्ता याचा मान जे धरीत नसत त्यांनी त्याच्या भक्तांवरहि द्वेष व बळा-

त्कार केला आहे. शत्रुत्व आणि बळात्कार पृथ्वीवर त्याकाळीं एवढा वाढत चालला आणि ईश्वराच्या भक्तांचे शत्रु इतके फार होत चालले कीं हा सरशेवटील उपाय ईश्वरास करावा लागला. सदाचरणाविषयीं नोहाचे शब्द व उपदेश यांस लोक अगदीं मानीत नाहींसे झाले. तारूं बांधी तोंपर्यंत १२० वर्षेंपर्यंत ईश्वराच्या आत्म्याने त्यांची समजूत करण्यास्तव जे यत्न केले ते सर्व निर्फळ झाले. ईश्वराची भक्तमंडळी इतकी कमी होत चालली कीं शेवटीं एक कुटुंब मात्र राहिलें. देवाने त्या पातकी लोकांचा नाश जर केला नसता तर त्यानी लवकर त्या मंडळीचा नाश केला असता, असें स्पष्ट दिसतें. त्या कुळामध्यें तारणार उत्पन्न होणार होता, ह्मणून त्याचें रक्षण अवश्य करायाचें होतें. या जगबुडीमुळें एक हित झालें कीं ईश्वराचे थोडेसे दुर्बळ भक्त यांसीं ज्यानी वैमनस्य मांडिलें होतें त्यांचें ईश्वरानें निर्मूळ केलें, आणि सर्व पृथ्वी नोहा आणि त्याचें कुटुंब यांस स्वस्थपणें भोगायास प्राप्त झाली.

दशम मासाच्या प्रथम दिनीं पर्वतांचीं शिखरें दिसूं लागलीं. परंतु नोहा तारवाची खिडकी उघडण्याच्या पूर्वीं चाळीस दिवसपर्यंत तसाच त्यांत होता. मग त्याने एक डोमकावळा सोडला तो डोमकावळा इकडे तिकडे उडत गेला व तो पुनरपि परत आला नाहीं. नंतर त्याने एक पारवा सोडिला; आणि तो पारवा पुन्हा त्याजवळ तारवांत आला. मग सात दिवस झाल्यानंतर त्याने पुन्हा त्या पारव्यास सोडिलें आणि पुन्हाहि तो पारवा परत आला; त्या वेळीं तर तो चोंचीमध्यें

एक हिरवें पान घेऊन आला. पुन्हा अणखी सात दिवस गेल्यानंतर त्याने त्या पारव्यास सोडलें. त्या वेळीं पारवा पुन्हा आला नाहीं. हें कृत्य प्रथम मासाच्या प्रथम दिनीं घडलें. नंतर नोहा तारवावरचें छपर काढून पाहूं लागला तों जमीन सुकी टांक झाली असी त्याच्या दृष्टीस पडली. नोहा द्वितीय महिन्याच्या २७ दिवसपर्यंत जमीन चालवायाजोगी सुकी टांक होईपर्यंत तसाच तारवांत होता. नंतर नोहा ईश्वराच्या उपकारास्तव कांहीं नैवेद्य त्यास घेऊन आला. त्या वेळीं प्रभूची असी वाणी झाली कीं मी पुन्हा मनुष्यांमुळें धरत्रीस शापणार नाहीं कारण कीं दुष्ट कल्पना मनुष्यांस लाहानपणापासूनच लागल्या आहेत आणि आतां मी केलें आहे तसें मी अवघ्या जीवांस कधींहि ठार मारणार नाहीं. आणि जोंपर्यंत पृथ्वी चालेल तोंपर्यंत तिजवर धान्य इत्यादिकांची लावणी व लांणी व शीतता व उष्णता, उन्हाळा व हिंवाळा, दिवस रात्र हीं होण्यास कधींहि बंद पडणार नाहीं.

मग ईश्वरानें नोहास आशीर्वाद देऊन त्या सांगितलेल्या कराराची खूण राहावी ह्मणून सुंदर सप्तरंगी धनुष्य ढगामध्यें करून ठेविलें आणि ईश्वर बोलला कीं माझ्यामध्यें व सर्व पृथ्वींतील प्राणिमात्रामध्यें जो करार झाला आहे त्याविषयींची ही खूण.

---



## गोष्ट ६. बाबेलचा बुरूज.

नोहा जगबुडीनंतर साडे तीनशें वर्षेंपर्यंत वांचला. त्यानंतर कोणीहि इतकीं पुष्कळ वर्षें वांचला नाहीं. त्याचा पुत्र शेम त्या प्रळयानंतर पांचशें वर्षें वांचला आणि त्याच्या डोळ्यादेखतां पुष्कळ संतती वाढली. परंतु नोहाचा नातू आरफाक्षाड हा केवळ चारशें अडतीस वर्षें वांचला आणि त्याचा पुत्र चारशें तेहतीस वर्षें वांचला. त्याचा नातू इबर हा चारशें चौसष्ट वर्षें वांचला हें खरें, परंतु त्यावेळेपासून मनुष्याची बळकटी फार त्वरेने कमी झाली; यामुळें कोणीहि दोनशें पन्नास वर्षेंपर्यंत वांचला नाहीं. शेम हा आपल्या दाहा पिढ्याच्या संततीपेक्षां अधिक वांचला. त्यावेळीं जे पराक्रमी मनुष्य होते ते लोकांस आपल्या सत्तेखालीं आणूं लागले. त्यांतील पहिला जुलमी मनुष्य ज्याचें नाव निमराड तो नोहाचा पणतू व शेमाचा नातू होता. त्याच्या राज्याचा प्रारंभ बाबेल शहर होतें.

त्या काळीं सर्व एकच भाषा बोलत. आपले लोक पृथ्वीच्या सपाटीवर चहूंकडे फांकूं नयेत ह्मणून त्याहीं षिनारेच्या मैदानांत एक शहर वसवून युफ्राटा नदीजवळ आकाशास शिखर पोहंचे असा एक बुरूज बांधायाचा निश्चय केला. परंतु हा त्याचा बेत ईश्वरास आवडला नाहीं. देव हें त्याचें करणें पाहून ह्मणाला आतां आपण जावें आणि त्याच्या भाषा निरनिराळ्या कराव्या ह्मणजे ते एकमेकांचें बोलणें समजणार नाहींत. तसेंच देवाने केलें. मग ते शहर वसवावयाचें सोडून परागंदा झाले. जर त्यांचें शहर वसविण्याचें आणि बुरूज बांधण्याचें काम बराबर चाललें असतें तर तेणेंकरून पृथ्वींतील पातकी लोक आणि देवभक्तांचे द्वेष्टे एकत्र झाले असते. त्यांचा तसाच हेतु होता त्या सर्वांचा समुदाय एकत्र मिळून ते सुभक्तांचा द्वेष फार करिते. याप्रमाणें भक्तमंडळी ममतेस्तव आणि तरणोपायाचा बेत सिद्धीस नेण्याकरितां देवाने वर सांगितलेल्या बाबेल शहर वसविण्याचें आणि बुरूज बांधण्याचें काम बंद पाडलें.

---

## गोष्ट ७. आब्रामास बोलावणें.

नोहाच्या मरणकाळाच्या थोडक्या दिवसांपूर्वीं शेमाच्या दाहाव्या पिढींत आब्राम जन्मला. त्यावेळीं मनुष्यें निरनिराळ्या देशीं वस्ती करीत होतीं आणि मूर्त्तिपूजेंत गर्क झालीं होतीं. तेव्हां प्रभु आब्रामास ह्मणाला, “आपला देश व सोयरे धायरे व आपल्या बापाचें घर सोड, आणि मी जो देश दाखवीन तेथें जा; व मी तुझी संतती मोठी करीन व तुला आशीर्वाद देईन व

तुझें नाव अब्रूस चढवीन; आणि तुजपासून कल्याण होईल; व तुझें जे शुभ चिंतीतील त्यांचें मी कल्याण करीन व जो तुला शाप देईल त्यास मी शाप देईन." नंतर आब्रामाने तसें केलें. या वेळीं त्याचें वय पंचाहत्तर वर्षांचें होतें. तो आपल्या बरोबर आपला भाचा लोट यास घेऊन गेला परंतु कांहीं दिवसांनंतर असें झालें कीं आब्रामाच्या कळपाचे व लोट याच्या कळपाचे गुराखे या उभयतांत कुरणविषयीं कलह उत्पन्न झाला कारण कीं, त्या उभयतांजवळ पुष्कळ गुरें होतीं आणि त्यांस एकत्र राहाण्यास पुरे असा तो देश नव्हता. मग आब्राम लोटास विनवून ह्मणाला कीं माझा व तुझा व तुझ्या गुराख्यांचा व माझ्या गुराख्यांचा कज्जा नसावा; कारण आपण भाऊबंद आहों. तुला हा पुढील देश दिसत आहे कीं नाहीं? तर मग मजपासून निराळा हो.



तूं जर डावी बाजू धरिलीस तर मी उजवी बाजू धरीन व तूं जर उजव्या बाजूस जाऊं लागलास तर मी डाव्या बाजूस जाईन.

मग लोट याने सिडीमचें सुंदर मैदान, जेथें सडोम व गमोरा शहरें होतीं, तें आपल्यास घेतलें. परंतु आब्राम हा खनान देशामध्यें राहिला.

---

## गोष्ट ८. आब्रामाचा विश्वास.

देव आब्रामाला आशीर्वाद देऊन ह्मणाला, "आब्रामा, भिऊं नको. मी तुझा रक्षणकर्ता आणि मेहनतीचें फळ देता आहें." आब्राम आपणास पुत्र नाहीं ह्मणून फार कष्टी होई असें देवाने पाहून त्यास घरांतून बाहेर नेऊन सांगितलें कीं, "तूं आकाशाकडे पाहा आणि तुझ्याने मोजवतील तर तेथें तारे किती आहेत ते मला सांग." आणि दुसरें असें सांगितलें कीं, "तुझी संतती यांच्या इतकी वाढेल." आब्रामाने देवावर भरंवसा धरून सत्य असें मानिलें.

जेव्हां आब्राम नव्याण्णव वर्षांचा झाला तेव्हां प्रभूने त्यांस दर्शन देऊन सांगितलें कीं, "मी सर्वशक्ती देव आहें. मी सांगेन त्याप्रमाणें चाल ह्मणजे तूं पूर्ण होसील. तुजसीं मी आपला करार करितों आणि तुझी संतती पुष्कळ वाढवीन. आणि तुला यापुढें आब्राम हें नांव ह्मटलें जाईल असें नाहीं, तुझें नाव आब्राहाम असें होईल. (आब्राहाम ह्मणजे राष्ट्रांचा बाप.) कारण कीं बहुत लोकांचा बाप मी तुला केला आहे." देवाने त्या कराराच्या निशाणीकरितां सुंता संस्कार नेमिला.

त्यानंतर माम्रीच्या मैदानांत आपल्या तंबूच्या दरवाज्यांत दुपारीं आब्राहाम बसला होता, तेव्हां त्याच्या जवळ प्रभु आला. आब्राहामाने वर दृष्टी करून पाहिलें

तों तिघेजण आपल्याजवळ उभे आहेत असें त्याने पाहिलें; तेव्हां तो लागलाच उठून त्यास भेटायास धांवत गेला आणि भूमीपर्यंत लवून नमस्कार करून बोलला, कीं "हे प्रभू, त्वां मजवर कृपादृष्टीने जर पाहिलेंस तर आपला दास जो मी यापासून जाऊं नये, असी माझी विनंती आहे. मला थोडेसें पाणी आणून तुमचे पाय धुऊं द्या. आणि या झाडाखालीं तुह्मी विसावा घ्या." असें ह्मणून तो लवकर तंबूंत सारेजवळ गेला आणि तीस ह्मणाला कीं, "तीन मापटीं पीठ लौकर तयार कर, व तें मळून त्याच्या भाकऱ्या निखाऱ्यावर भाज." याप्रमाणें तीस सांगून आपण गेला आणि एक चांगलें कोमळ वासरूं आणून तेंहि रांधिवलें. मग त्याने लोणी दूध आणि तें रांधलेलें वासरूं त्यांपुढें ठेविलें आणि त्यांनीं खाल्लें. त्यानंतर प्रभु आब्राहामास ह्मणाला, "मी खचित सुमारें जननाच्या वेळाने माघारें येईन आणि तुझी स्त्री सारा ईस पुत्र होईल."

मग तीं मनुष्यें उठलीं आणि सदोमाकडे जाऊं लागलीं व आब्राहाम त्यांच्या बराबर चालला. त्यासमयीं प्रभु ह्मणाला कीं, "मी जें करितों तें आब्राहामापासून लपवीन कीं काय? कां कीं तो आपल्या मुलानां व इतर घरांतील मनुष्यानां आपल्यासारिखेच, चालायास हुकूम करील आणि ते नीति व न्याय करितांना परमेश्वराचा मार्ग पाळतील, याविषयीं मला माहीत आहे यास्तव कीं आब्राहामाला जसें वचन दिल्हें तसें त्याला प्राप्त व्हावें.

मग प्रभूने आब्राहामास सांगितलें कीं, "मी सदोम

व गमोरा एथील पापी मनुष्यांस शासन करायास जात आहें कां कीं त्यानी महान पातक केलें आहे." हें ऐकून आब्राहामाने प्रश्न केला, "जर कदाचित् तेथें पन्नास जण चांगल्या मार्गाने चालणारे असले तर तूं तें शहर त्या पन्नासांकरितां राखसील कीं त्याचा नाश करिसील? प्रभू! तूं सर्व पृथ्वीचा न्यायकर्त्ता आहेस. पातक्यांबराबर साधूजनास लेखून त्यांस ठार मारून टाकणें ही गोष्ट तुझ्यापासून दूर होवो." हें देवाने ऐकून उत्तर केलें कीं, "जर सडोमामध्यें पन्नास जण चांगल्या रीतीने वागणारे असले तर त्यांच्याकरितां मी तें सर्व शहर वांचवीन." आब्राहाम फिरून बोलला, "जर कदाचित पन्नासांना पांच कमी असले तर त्यांच्या कमतीमुळें सर्व शहराचा नाश करसील काय? नाहीं करणार, असें देवाने उत्तर केलें. चाळीस असले तर? नाहीं करणार. तीस असले तर? तीस सांपडतील तर त्या शहराचा नाश करणार नाहीं." आब्राहामाने संख्या उतरीत उतरीत दाहावर आणून, शेवटीं विचारिलें कीं, "दाहाच असले तर काय करसील? नाश करसील कीं वांचविसील?" हें ऐकून प्रभूने उत्तर दिल्हें कीं, "मी दाहा जरीं असले, तरीं त्यांच्याकरितां सर्व शहर वांचवीन." असें बोलून प्रभु चालता झाला आणि आब्राहाम आपल्या घरीं आला.

ही गोष्ट संपविण्यापूर्वी आपण देवाच्या निरभिमानावर क्षणभर विचार करूं या. पाहा! तो आपणावर नीचपणा घेऊन, मनुष्याचें स्वरूप धारण करून, कोणी मनुष्य आपल्या मित्रापासीं जसा बोलतो, त्याप्रमाणें त्या-

चा दास जो आब्राहाम त्याजपासीं समक्ष होऊन बोलला. परंतु याहिपेक्षां गोष्ट आश्चर्यकारक आहे, ती असी कीं जो आब्राहामाच्या दृष्टीस पडला, तोच पुढें अवतारी होऊन खंती आणि दुःखी माणसासारिखा पृथ्वींतील मनुष्यांबराबर राहिला; आणि शासन व नाश करून राहिला असें नाहीं तो क्षमा करून पुष्कळानां तारण्याकरितां आपला जीव द्यावा ह्मणून राहिला.

आब्राहामाने त्या शहराकरितां प्रार्थना केली या गोष्टीवरून आब्राहामापेक्षां अधिक मोठा जो येशू ख्रीस्त आपल्या लोकांकरितां मध्यस्थी करायास चिरकाळ जिवंत आहे, त्याचें आपणास स्मरण असो. आणि त्याची रहबदली कधींहि व्यर्थ जायाची नाहीं तिचा लाभ आपणास व्हावयाकरितां आपण अंतःकरणापासून भाव ठेवावा.

---

## गोष्ट ९. सडोम व गमोरा शहरें याविषयीं.

जेव्हां ते दोन देवदूत सडोम शहरांत आले तेव्हां संध्याकाळ झाला होता. लोट हा त्यांस साधारण मनुष्यें असें समजून भेटायास गेला आणि त्यानी आपल्या घरीं त्या रात्रीं राहावें ह्मणून सन्मानपूर्वक त्यांस आग्रह करूं लागला. मग त्यानी राहायाचें कबूल केलें; परंतु त्या शहरांतील मनुष्यें रात्रभर तिरस्कार करण्याजोगें दुराचरण करीत होतीं, असें कीं सरशेवटीं त्या देवदूतानी त्यांस आंधळें केलें, तेणेकरून त्यांस लोट याच्या घराचें दार कोठें आहे हें समजलें नाहीं. नंतर ते देवदूत लोट यास ह्मणूं लागले, "तुझे कोणी एथें सोयरे

आहेत कीं काय ? कारण कीं आह्मी या शहाराचा नाश करणार आहों." असें ऐकतांच लोट याने आपल्या जामातास सांगून पाठविलें; परंतु ते त्यास हांसले.

जेव्हां प्रातःकाळ झाला तेव्हां देवदूत लोट यास उतावळ करूं लागले; आणि तो विलंब करीत आहे असें पाहून त्यानीं त्याचा व त्याच्या स्त्रीचा व त्याच्या दोन्ही मुलींचा हात धरून त्यांस शहराबाहेर आणिलें. मग प्रभूचा दूत ह्मणाला "आपला जीव बचावयासाठीं पळ; आपल्यामागें पाहूं नको व ह्या सर्व मैदानांत राहूं नको." जेव्हां लोट हा झोहार एथें पोहंचला, तेव्हां सूर्य उगवला होता. मग प्रभूने आकाशांतून सडोम व गमोरा या शहरावर गंधक व अग्नि यांचा वर्षाव केला आणि त्या सर्व देशाचा नाश झाला. जेथें तें सुंदर मैदान होतें तेथें आतां सरोवर आहे; त्याचें नाव मरणाचें सरोवर. आजपावेतों या उदासकारक देशाकडे पाहिलें असतां, ईश्वर दुराचरणी मनुष्यांस किती भयंकर शासन करितो याविषयीं सुचना होती. लोट याच्या स्त्रीने मागें पाहिलें ह्मणून ती मिठाचा खांब झाली.

जेव्हां प्रभु येशू ख्रीस्त पृथ्वीवर होता तेव्हां दोषी सडोम शहर व त्याचें शासन याविषयीं तो वारंवार बोलत असे. तो म्हणत असे कीं, "न्याय होण्याच्या दिवसीं कापेरणाहूम शहर जेथें मी बहुत मोठीं कृत्यें केलीं त्याला सडोम शहरापेक्षां कठीण न्याय होईल. आणि असें कां ह्मणाल तर ऐका. कापेरणाहूम एथील लोकानी त्या येशूला चमत्कार करतांना पाहिलें व भा-

षण करतांना ऐकिलें तथापि त्यानीं आपलीं अंतःकरणें कठोर केलीं, आणि पापाचा पश्चात्ताप केला नाहीं.

अहो प्रिय वाचणारानो! ही मोठी आपणास गंभीर गोष्ट होय. कारण कीं आपल्या कानीं शुभवर्त्तमाची आनंदकारक ध्वनी पडली आहे; व देवाने आपल्या प्रियकर पुत्राच्या मरणाने आमच्या पापाची क्षमा व आमच्या आत्म्याचें तारण याविषयीं उपाय केला आहे, असेंहि आपणास कळलें आहे. जर आपण असें तरणोपायाविषयीं हयगय केली, तर खचितच न्याय होण्याच्या दिवशीं त्या मैदानावरील शहरांतील दोषी राहाणार यापेक्षां आपलें वाईट होईल. तर आपण याविषयीं विचार करावा आणि जो पुढें आपणावर राग होणार तो दूर व्हावा ह्मणून येशू ख्रीस्ताजवळ जाण्याला एक क्षणहि विलंब करूं नये.

---

## गोष्ट १० इस्माएल.

आब्राहामाला हागारेपासून एक मूल होता. त्याचें नाव इस्माएल होतें. तो आब्राहामाच्या वयास शाऐशीं वर्षें असतां जन्मला.

सारा इने परमेश्वराच्या कृपेने पुत्र प्रसवली; हा पुत्र जन्मला तेव्हां आब्राहाम शंभर वर्षांचा होता; आणि मुलाचें नाव त्याने इझाक ठेविलें. सारेने इस्माएलास टवाळखोर असा पाहून आब्राहामास ह्मणाली कीं, “अहो आब्राहाम, या चाकरिणीला व इच्या पोराला हाकून लावा.” हें ऐकून आब्राहामास फार दुःख वाटलें; परंतु

देव बोलला, "अरे आब्राहामा, तूं त्या चाकरिणीकरितां व तिच्या मुलाकरितां कष्टी होऊं नको. कां कीं इझाकापासून तुझी संतती वाढेल; आणि तसाच तुझ्या चाकरीणीच्या मुलाचाहि वंश वाढेल; कां कीं तो तरीं तुजपासूनच उत्पन्न झाला आहे." आब्राहामाने पहाटेस उठून हागारेच्या खांद्यावर भाकर व पाण्याने भरलेला शिसा देऊन तिला व तिच्या मुलास बाहेर घालविलें. यानंतर तीं दोघें फिरत फिरत बीरषिबाच्या रानांत गेलीं. तिच्या जवळच्या शिशांतलें पाणी संपून गेलें; व तेथें आसपास विहीर नव्हती यास्तव ती आपल्या मुलापासून फार दूर जाऊन बसली; मनांत कीं, आपला मुलगा ताहानेनें मरेल तें आपल्या दृष्टीस न पडावें. देवाच्या कानीं त्या मुलाचा शब्द पडला, आणि देवदूताने आकाशांतून हागारेस हाक मारून विचारिलें, "हे हागारे, तुला काय दुःख आहे? तूं भिऊं नको. तुझा मुलगा जेथें आहे, तेथून त्याचा शब्द देवाच्या कानीं गेला." या उपरांत देवाने तिचे डोळे उघडले, आणि त्या क्षणींच तिच्या दृष्टीस एक विहिर पडली. नंतर त्या विहिरीवर जाऊन तिने आपल्या जवळचा शिसा पाण्याने भरून आपल्या मुलास प्यायास दिल्हा. या प्रकारें देव त्या मुलावर कृपा करीत असे ह्मणून तो वाढला. मग तो त्या रानांत वस्ती धरून तिरंदाज झाला.

त्याचे बारा राजपुत्र झाले; यांचा सांप्रत काळपर्यंत वंश वाढत आला आहे; त्यांस आरबी ह्मटलें आहे.

---

## गोष्ट ११. इझाक.

या उपरांत देव आब्राहामाचें सत्व पाहण्यास्तव त्यास ह्मणाला, "तूं आपला प्रियकर मुलगा घेऊन मोरिया प्रांतांत जा आणि जो डोंगर मी तुला सांगेन त्यावर त्याला होमरूप समर्पण कर." त्याप्रमाणें आब्राहामाने पाहटेस उठून आपल्या गाढवावर खोगीर घातला व बरोबर आपला मुलगा इझाक व आपले दुसरे दोन तरूण माणसें घेऊन निघाला. तिसऱ्या दिवशीं जेव्हां ती जागा लांबून दृ-



ष्टीस पडूं लागली तेव्हां तो त्या तरूण मनुष्यांस ह्मणाला, "तुह्मी माझें गाढव संभाळून एथेंच राहा." असें त्यांस सांगून त्याने होमाकरितां लांकडें मुलाच्या खांद्यावर दिल्हीं आणि आपल्या हातांत सुरी आणि विस्तव घेतला; आणि दोघेजण संगतीं चालते झाले. वाटेंत चालतांना इझाक बापास ह्मणाला, "बाबा, एथें होम करायास लांकडें आणि विस्तव आहे; परंतु होमासाठीं कोंकरूं कोठें आहे?" यावर आब्राहामाने उत्तर दिल्हें कीं, "माझ्या पुत्रा, देव आपल्यासाठीं होमाचें कोंकरूं

देईल." असें बोलणें झल्यानंतर ते दोघे पुढें तसेच चालले.

याप्रकारें जेव्हां ते दोघे देवाने सांगितल्या जागी येऊन पोहंचले, तेव्हां आब्राहामानें एक स्थंडिल केलें, आणि त्यावर लांकडें रचलीं; नंतर आपल्या मुलाला बांधून त्याला त्या रचलेल्या लांकडावर ठेविलें मग आपला हात लावून आपला पुत्र वधायासाठीं सुरा घेतला आहे. इतक्यांत प्रभूच्या दूताने आकाशांतून त्यास हाक मारून सांगितलें कीं, "आब्राहामा, तूं आपल्या पुत्रावर हात टाकूं नको, कारण कीं माझी आतां खात्री झाली कीं, प्रभूला तूं भितोस; कां कीं तूं मला आपला एकुलता एक पुत्र देण्यास मागें हटला नाहींस." हें ऐकून आब्राहामाने वर दृष्टी करून पाहिलें तों एक मेंढा एक्या जाळींत आपलीं शिंगें गुंतून अडकलेला असा आहे. त्यानंतर आब्राहाम तेथें गेला आणि त्या मेंढ्यास आणून त्याची आहूति आपल्या पुत्राच्या बद्दल देता झाला. आणि प्रभूचा दूत पुनः आकाशांतून एकदां हाक मारून ह्मणाला कीं, "मी शपथ घेऊन सांगतों कीं, ज्या अर्थीं तूं आपल्या एकुलत्या पुत्राचीहि बळी द्यावयास मागें हटला नाहींस, त्या अर्थीं मी तुला आशीर्वाद देईनच देईन आणि तुझी संतती आकाशावरील चांदण्यासारिखें व समुद्रकिनाऱ्यावरील रेतीसारिखें अगणित वाढवीन; आणि तुझ्या संततीच्या स्वाधीन शत्रूचे दरवाजे होतील व पृथ्वीवरील सर्व राष्ट्रें तुझ्याच संततीच्या योगाने सुख पावतील, कारण कीं तूं माझी गोष्ट ऐकिली आहेस, असें परमेश्वर बोलतो." मागील गोष्टींत भविष्य

दाखविणारें जें वाक्य सांगितलें त्याच्या अधिक स्पष्ट दाखविणारें हें शुभवर्त्तमान आहे. कां कीं यांमध्यें ख्रीस्त जन्मास येणार एवढेंच सांगितलें असें नाहीं; परंतु इतकें देखील सांगितलें कीं, तो आब्राहामाच्या वंशांत जन्मेल आणि पृथ्वीवरील संपूर्ण जगास सुख देईल.

इझाकाचें आपल्या बापाच्या आज्ञेंत वर्त्तणें आणि देवाच्या आज्ञेवरून मरायास इच्छिणें याविषयींच्या गोष्टीवरून येशू ख्रीस्ताचेंहि स्मरण पडावें. त्याने पातक्यांना वांचविण्याकरितां स्वइच्छेने बापाच्या आज्ञेने वधस्तभीं आपला जीव दिल्हा. त्यावर आपण प्रीति ठेवावी आणि त्याचा आभार मानावा. आणि ज्यापेक्षां आपण पाहतो कीं, आब्राहाम आपला एकुलता एक मुलगाहि देवाच्या आज्ञेवरून द्यावयास मागें सरला नाहीं, त्यापेक्षां देवाची जगावर प्रीति आहे म्हणून त्याने आपला एकुलता एक मुलगा जो ख्रीस्त त्याला लोकांकरितां मरायास दिल्हा. या नवलकारक गोष्टीवर आपण विचार करावा.

---

## गोष्ट १२. सारेचा मृत्यु आणि मूठमाती देणें.

सारा हिब्रोन एथें मरण पावली तेव्हां आब्राहाम १३७ वर्षांचा होता. आब्राहाम खानान देशांत साठ वर्षें राहिला होता, तरी त्या देशांत त्याची स्वताची असी जमीन एक पाऊल भर देखील नव्हती. तो आपल्या मेंढ्याचा कळप उघड मैदानांत चारून खानानी लोकांत वागे. या प्रसंगीं त्याला आपल्या स्त्रियेचें

प्रेत स्वताच्या जमिनींत पुरावें म्हणून थोडीसी जागा विकत घ्यावी असी इच्छा प्राप्त झाली; यास्तव त्याने हेथाच्या वंशांतील मुख्य ग्रहस्थांस फार मान देऊन विणवणी केली. त्यावर त्यांनीहि तसींच सभ्य रितीनें उत्तरें दिल्हीं. त्याने त्या मुख्यांस प्रार्थिलें कीं, "मला थोडीसी जमनि विकत द्या." त्यावर त्यांहीं उत्तर केलें कीं, आम्ही तुला ती मुफत देतों परंतु विकत देत नाहीं. पण आब्राहामाने फार आग्रह धरिला आणि त्यांस म्हणाला कीं, तुम्ही ती विकतच द्या." अशा प्रकारचें पुष्कळ भाषण झाल्यानंतर शेवटीं त्यांतून एक एफ्रोन नावाचा गृहस्थ चारशे रुप्याचे शेकेल घेण्यास कबूल झाला, आणि मग आब्राहाने आपल्या स्त्रियेचें प्रेत हीब्रोन एथील माकपेलाच्या शेतांत माम्री झाडीच्या समोर गुहेंत गाडलें.

---

## गोष्ट १३. इझाकाचें लग्न.

जेव्हां आब्राहाम फार म्हातारा झाला तेव्हां त्याने आपल्या सर्व चाकरांत जो वडील होता त्यास मेसोपोटामिया देशीं आपलें सोयरे धायरे राहात होते तेथें आपला पुत्र इझाक यास नवरी पाहण्याकरितां पाठविला. त्या चाकराने इझाकाकरितां प्रभूने नेमलेली जी नवरी तीस लग्नाच्यापूर्वीं नजराणा द्यायाकरितां सर्व जातींचे पदार्थ दाहा उंट भरून आपल्याबरोबर घेतले. आणि

तो नाहोराच्या शहरास संध्याकाळीं बायका पाण्याला जातात त्या समयीं येऊन पोंचल्यावर त्याने त्या शहराच्या बाहेर एक विहिरीजवळ आपले उंट बसविले, आणि त्याने देवाची प्रार्थना केली कीं, "हे देवा माझ्या धन्याच्या प्रभू तूं माझें हें कार्य चालवून माझ्या धन्यावर कृपा कर. पाहा मी एथें पाण्याच्या विहिरीजवळ उभा आहे, आणि नागरीक लोकांच्या मुली पाणी काढावयाकरितां येतील, तेव्हां ज्या मुलीला मी ह्मणेन कीं, मुली, मी तुला विनंती करितों, तूं घागर खाली ठेव आणि मला पाणी पिऊं दे; आणि ती ह्मणेल पी, आणि मी तुझ्या उंटानाहि पाजतें,जी मुलगी तूं आपला दास इझाक यासाठीं नेमली ती होवो.

असें तो बोलताहे इतक्यांत बेथुवेलची मुलगी रिबका आपल्या खांद्यावर घागर घेऊन आली मग ती विहिरींत उतरली आणि आपली घागर भरून चढली. तेव्हां तो चाकर तिच्या जवळ त्वरेने जाऊन बोलला कीं, "मी तुला विनंती करितों कीं, तूं मला तुझ्या घागरींतलें थोडेंसें पाणी पिऊं दे." त्यावर तिने उत्तर केलें कीं,



"महाराज प्यावें; आणि मी तुमच्या उंटासहि पाणी प्यावयास आणितें." मग तिने उंटाकरितां पाणी आणिलें. हें पाहून आब्राहामाचा चाकर तिजविषयीं आश्चर्य पावला, आणि त्याने एक सोन्याची बाळी तिच्या कानांत घातली व दोहीं हातांत दोन सोन्याच्या पाटल्या घातल्या आणि तिला विचारिलें कीं, "तूं कोणाची मुलगी आहेस?" त्यावर तिने उत्तर दिल्हें कीं, "मी नाहोराचा पुत्र जो बेथुवेल त्याची मुलगी आहें." (नाहोर तर आब्राहामाचा चुलत भाऊ होता.) हें ऐकून त्याने नमन करून देवाचा स्तव आरंभिला; कीं, "माझा धनी आब्राहाम याचा देव परमेश्वर याची स्तुति असो; माझ्या धन्यावर त्याची कृपा आहे ह्मणून त्याने मला धन्याच्या भाऊबंदाच्या घराचा रस्ता दाखविला आहे." असें बोलून तो चाकर त्या मुलीबराबर तिच्या बापाच्या घरीं गेला.

दुसऱ्या दिवशीं तो म्हणाला कीं, "मला आपल्या धन्याकडे जाऊं द्या, कोणी आड येऊं नको." तेव्हां त्यांहीं रिबकास विचारिलें कीं, "मुली तूं या मनुष्याबरोबर जातेस काय?" तिने उत्तर केलें कीं, "होय मी जात्यें." यानंतर त्यांहीं तीस आशीर्वाद देऊन ह्मटलें कीं, "तूं आमची बहीण आहेस तुला लक्षावधी मुलें होवोत" याप्रमाणें इझाक आपली आई मेल्यानंतर शांतवन पावला.

---

## गोष्ट १४. याकोब आणि एसाव.

इझाकाचें लग्न रिबकेशीं झालें, तेव्हां त्याचें वय चाळीस वर्षांचें होतें. आणि त्याच्या साठाव्या वर्षी त्यास जुळें झाले. ते दोघे मुलगे स्वभावाने व रूपाने केवळ निराळे होते. पहिल्याने जो उपजला त्याचें रूप आणि वर्त्तणूक रांठ होती परंतु दुसऱ्याने जो उपजला तो रूपाने व स्वभावाने नम्र होता. यांतील पहिल्याचें नाव एसाव व दुसऱ्याचें नाव याकोब. जेव्हां ते मोठे झाले तेव्हां एसाव पारधीपणा करूं लागला. परंतु याकोबाने आपल्या बापाची रीत धरिली आणि मेंढपाळ होऊन तंबूंत वस्ती केली. इझाकाची प्रीति स्वच्छंदी जो एसाव त्याजवर होती; परंतु रिबकाची प्रीति शांत स्वभावाचा जो याकोब त्यावर होती.

एक्या दिवशीं असें घडून आलें कीं, याकोबाने मसुरा घालून, मासाची कढी केली होती, इतक्यांत एसाव पारध करून थकलेला असा आला; आणि याकोबास ह्मणाला कीं, "मी तुझी प्रार्थना करितों, ती तांबडी मासाची कढी मला खायास दे." हें ऐकताक्षणीं त्याने उत्तर केलें कीं, "तूं मला आपला ज्येष्टपण आज विकत दे, ह्मणजे मी तुला ती कढी देईन." यानंतर एसावाने विचार केला कीं, "आपण अगदीं मरायास टेंकलों आहों, आपल्याला तर या ज्येष्ठपणापासून काय हित व्हावयाचें आहे ?" असा विचार करून एसावाने आपलें ज्येष्ठपण शपथ घेऊन विकलें; परंतु असा अविवेकी करार होत्यावेळेस त्याचा बाप त्याजवळ नव्हता ह्म-

णून तो अधिकार एसावाला अझूनहि मिळविण्याची संधी होती.

जेव्हां इझाक म्हातारा झाला, तेव्हां त्याला दिसेना असे त्याचे डोळे मंद झाले, आणि त्याला वाटूं लागलें कीं, आपलें मरण जवळ आलें. म्हणून त्यानें एसावाला बोलावून त्याला सांगितलें कीं, पाहा "मी म्हातारा झालों आणि मला मरण केव्हां येईल, हें सांगवत नाहीं; यास्तव तूं कृपा करून आपला भाता व धनुष्य घेऊन कांहीं पारध करायास जा; आणि मला जें आवडतें तें रूचकर मांस तयार कर आणि मजकडे आण; तें मी खाऊन मरणाच्यापूर्वीं तुला आशीर्वाद देईन.

जेव्हां एसाव गेला, तेव्हां रिबकाने दोन बकराच्या मासाचें जेवण इझाकाला जसें फार आवडत असे तसें तयार केलें आणि याकोबाच्या हातीं देऊन पाठविलें. मनांत कीं त्याला त्याच्या बापापासून आशीर्वाद मिळावा. मग याकोबाने तें अन्न घेऊन व आपल्या बापाजवळ येऊन त्याला हाक मारिली. इझाकाने विचारिलें कीं, "तूं कोण आहेस?" तेव्हां याकोब बोलला कीं, "मी एसाव तुझा ज्येष्ठ पुत्र. मी तुझ्या आज्ञेप्रमाणें केलें आहे. तुम्ही कृपाकरून उठावें आणि हें रूचकर मांस, आपणाकरितां मी आणिलें आहे, हें खावें; आणि मला आशीर्वाद द्यावा." हें ऐकून इझाकानें त्याचा हात चाचपून पाहिला; कां कीं, एसावाचे हात खरखरीत होते आणि याकोबाचे मऊ होते; परंतु रिबकाने कपटेंकरून त्याच्या हातांत खरखरीत चामडें घातलीं होतीं, म्हणून हातावरून इझाकास पारख झाली नाहीं परंतु शब्द

ऐकून ह्मणाला कीं, "शब्द तर याकोबाचा ऐकूं येतो, पण हात तर एसावाचे असें वाटतें." नंतर पुनः इझाकानें विचारिलें कीं, "खरेंच सांग, माझा मुलगा एसावच कां तूं?" यावर तो ह्मणाला कीं, "होय, मी एसाव." नंतर त्यानें तें मांस खाल्लें आणि द्राक्षरस प्याला; आणि मग याकोबास बोलला, "माझ्या मुला, जवळ ये. मला मुका दे." मग तो त्या पुत्रास आशीर्वाद देऊन बोलला, आकाशांतील दंव व भूमीचीं पुष्टपणें आणि पुष्कळ धान्य व द्राक्षांचा नवा रस हीं देव तुला देवो; लोक तुझी चाकरी करोत आणि प्रजा तुला नमून असोत; तूं आपल्या भावांचा स्वामी हो व तुझे दाइज तुला नमून असोत; तुझें वाईट इच्छितील त्यांचें वाईट होवो; आणि तुझें बरें इच्छितील त्यांचें बरें होवो.

याकोब बाहेर गेल्यानंतर लागलाच एसाव पारध करून, रुचकर मांस घेऊन आला आणि आपल्या बापास ह्मणाला, "बाबा, उठ, आणि मी मांस आणिलें आहे, हें खा." हें ऐकून, इझाक अतिशयच थरथरां कांपून बोलला, "अरे, तूं यावयाच्या पूर्वीं ज्यानें माझ्याजवळ मांस आणिलें आणि मला खायास दिल्हें, आणि माझा आशीर्वाद घेतला, तो कोण कोठें? अरेरे! त्याला मी आशीर्वाद दिल्हा. फार वाईट गोष्ट झाली." नंतर एसाव ह्मणाला, "बाबा, मलाहि आशीर्वाद दे." यावर त्यानें उत्तर केलें कीं, "तुझा भाऊ ठकबाजी करून तुझा आशीर्वाद घेऊन गेला." तें ऐकून एसाव दुःख पावून रडला. आणि मग इझाक बोलला, "तुझ्या जमिनीवर



आकाशांतून दंव पडून, ती पुष्कळ पीक देवो. तूं आपल्या तरवारीने जगसील आणि आपल्या भावाची चाकरी करसील; आणि असें घडून येईल कीं, जेव्हां तुला राज्य मिळेल, तेव्हां तूं याचे तांबेतून निघसील." याकोबाला आशीर्वाद मिळाला ह्मणून एसावाने त्यासीं द्वेष धरिला आणि त्यास भयाच्या धमकी दाखवून बोलूं लागला कीं, "माझ्या बापाकरितां शोकाचे दिवस जवळ आहेत तेव्हां मी आपल्या याकोब भावाला ठार मारीन." यास्तव त्याच्या आईने याकोबास सांगितलें कीं, "तूं हारान देशांत पळून जा; आणि तेथें माझा भाऊ लाबान आहे त्याजवळ राहा."

पळून जाऊन वाटेंत याकोबाला बहुत दुःखें प्राप्त झालीं; कां कीं जे कोणी दुसऱ्याना ठकवून आपलें हित पाहतात, त्याना असींच दुःखें होतात. पाहा, कीं याकोबाला आपल्या घरचीं सुखें सोडून प्रवासाचे कष्ट भोगावे लागले; परक्याच्या कुटुंबांत चाकरी करावी

लागली; त्याची आणि त्याच्या प्रियकर आईची भेट पुनः कधीं झाली नाहीं, असें दिसतें; आणि आपल्या भावाला आपण दुष्टपणाने ठकविलें ह्मणून तो आपला सूड उगवील, याची धास्ती त्याला लागली असावी. मग जेव्हां तो ह्मातारा झाला, तेव्हां त्याची मुलें त्यासीं दुष्टपणाने वागून मागें जसें त्याने आपल्या इझाक बापास ठकविलें होतें तसें त्यांनीहि त्यास ठकविलें. ठीक व खरें धर्मशास्त्रांतील वाक्य आहे, तें असें जो तूं दगलबाज त्या तुला विपत्ती असो; शेवटीं लोक तुजसीं दगलबाजी करतील. अहो प्रिय वाचणारानो, रिबकाची आणि तिचा मुलगा याकोब याची लबाडी देवाला आवडती झाली, असें तुह्मी मानूं नका: परंतु त्यांच्या उदाहरणावरून, ही सुचना घ्या कीं पुष्कळ हित होईल असें जरी दिसलें तरी जें कर्म वाईट ह्मणून तुमची खातरी आहे तें तुह्मी कधींहि करूं नका.

---

## गोष्ट १५. याकोबाचें भटकत फिरणें.

याकोब आपल्या बापाची रजा घ्यावयास आला, तेव्हां त्याने त्यास स्पष्ट सांगितलें कीं, "याकोबा, तूं खनान देशांतील मुलींतून कोणत्याहि एका मुलीसीं लग्न करूं नको; परंतु जा आणि तुझ्या मामाच्या मुलींतून एक्या मुलीसीं लग्न कर." वाटेंत एक्या ठिकाणीं तो उशाला दगड घेऊन निजला होता, तेव्हां त्याला एक स्वप्न पडलें. त्याने जमिनीपासून आकाशापर्यंत उंच, असी एक शिडी पाहिली; त्या शिडीवरून देवदूत वर चढता-

हेत व खालीं उतरताहेत ; आणि देव वरतीं उभा राहून बोलतोहे कीं, "मी आब्राहामाचा देव परमेश्वर आहें आणि इझाकाचाहि मीच देव आहें ; ज्या जमिनीवर तूं निजला आहेस, ती तुला मी वंशपरंपरा देईन. तुझा वंश पृथ्वीवरील धुळीप्रमाणें पूर्व पश्चिम, दक्षिण उत्तर, या चारहि दिशेस पसरेल. आणि पाहा, तुझ्याबराबर मी आहें. जेथें जेथें तूं जासील, तेथून मी तुला या जागीं आणीन ; कां कीं जें मी आतां तुजविषयीं बोललों आहें, तसें केल्यावांचून मी तुला सोडणार नाहीं."

जेव्हां याकोब जागा झाला तेव्हां ह्मणाला, "खचीत देव एथें आहे मला हें अगदीं ठाऊक नव्हतें." अणखी तो भिऊन बोलला, "किती भयंकर ही जागा आहे! मला वाटतें कीं हें देवाचें घर आहे आणि हा आकाशाचा दरवाजा आहे." मग त्याने तो उशास घेतलेला दगड निशाणासारिखा करून ठेविला ; आणि त्या जागेला त्याने "बेथेल" ह्मणजे देवाचें घर, असें नाव दिल्हें.

फार दिवस प्रवास करून याकोब हारान शहर जेथें लाबान राहत होता तेथें पोहंचला ; आणि मागें जसा आब्रामाचा चाकर रिबकेला भेटला, तसा हा विहिरीजवळ राहेल ह्मणजे लाबानाची सुंदर कन्या इला भेटला. त्याला ती अवडली ह्मणून त्याने तिजकरितां लाबानाकडे सात वर्षें चाकरी केली ; परंतु लाबानाने त्याला ठकवून राहेलेच्या बद्दल दुसरी ल्या नामक कन्या दिल्ही आणि त्याला सांगितलें कीं, "दुसरीकरितां अणखी सात वर्षें चाकरी कर." याकोबाला बारा मुलगे झाले. त्या बाराजणापासून इस्राएलाच्या बारा निरनिराळ्या जाती झा-

ल्या. त्यांचीं नावें; रऊबेन, शिमोन, लेवी, यहूदा, दान, नाफ्ताली, गाद, आशेर, इस्साखार, जबूलुन, योसेफ आणि बन्यामिन.



याकोब चवदा वर्षें लाबानाकडे चाकरी करून, अणखींहि साहा वर्षें त्याकडेसच राहिला. त्या वेळेस देवाची त्यावर कृपा होऊन त्यास चाकर, कुणबिणी, उंट, गाढवें, गुरें, आणि मेंढे पुष्कळपणीं मिळाले. लाबान आपल्या जावयाची असी संपत्ति पाहून, हेवा करूं लागला. याकोब आपल्या दोन्हीं बायकाना शेतांत बोलावून, त्यासहित आपलीं सर्व गुरें, मेंढे व इतर संपत्ति घेऊन, लाबानासीं शब्द न बोलतां, जाता झाला. या गोष्टीला तीन दिवस झाल्यानंतर, लाबानाला कळून आलें कीं, याकोब पळून गेला. तेव्हां तो पाठलाग करून, सात दिवसांनंतर, त्याला अटोपला; परंतु देवाने लाबानाच्या स्वप्नांत येऊन सांगितलें कीं, "खबरदार, तूं याकोबाला कांहीं दुखावून बोलूं नको."

नंतर लाबानाने गिलाद डोंगरावर याकोबासीं कांहीं

करार करून घेतला, आणि मग ते दोघेहि एकमेकाची रजा घेऊन आपापला मार्ग निवांतपणाने चालते झाले.

याकोबाने आपण आलों हें वर्त्तमान कळविण्याकरितां एसावाकडे जासूदपाठविले. तें ऐकून एसाव चारशें मनुष्यें बरोबर घेऊन, भेटायास सामोरा आला. तेव्हां याकोब फार भयाभीत होऊन, दुःख पावला. आणि त्याने जीं गुरें, ढोरें व मेंढे व लोक त्याच्या बराबर होते, त्यांच्या दोन फळ्याकेल्या; तो ह्मणाला, "जर एसावाने एका फळींतल्याना मारलें, तर दुसऱ्या फळींतल्यानी पळून जावें. मग याकोबाने देवाची प्रार्थना केली कीं, "हे परमेश्वरा, आब्राहाम व इझाक जे माझे वडील त्यांच्या देवा, मला तूं बोलला आहेस कीं, तूं आपल्या देशास नातलगाकडे जा; मी तुला राखीन. तूं अत्यंत दयेनें व सत्यतेने तुझा दास जो मी, त्या मला चालविलें आहेस; त्या दयेस मी अगदी योग्य नाहीं. मी हातांत काठी घेऊन



ही यार्देन नदी उतरलों, आणि आतां मी आपल्याच्या दोन फळ्या केल्या आहेत. तूं कृपा करून मला माझा

भाऊ जो एसाव याजपासून मला सोडीव. कारण कीं मला भय वाटतें कीं तो येऊन मला मायलेंकरांसुद्धां मारील. परंतु तूं बोललास कीं मी खचित तुझें कल्याण कल्याण करीन आणि तुझी संतती अपार वाढवीन." मग याकोबाने आपला भाऊ जो एसाव यास भेट देण्याकरितां, फार चांगलींसीं गुरें व मेंढे व उंट निवडून काढिले; आणि हे आपल्या चाकरानां देऊन सांगितलें कीं, "एसावाने जर विचारिलें कीं, हीं गुरें व मेंढे कोणाचे आहेत, तर तुह्मी त्यास उत्तर करा कीं तुझा दास जो याकोब याचीं आहेत; आणि त्याने तुला त्यांची भेट पाठविली आहे." मग त्याने आपल्या मंडळीस याब्बोकनदीच्या पलिकडे जाऊं दिल्हें; आपण एकटाच राहिला. तेथें एका मनुष्याने त्यासीं उजाडेपर्यंत कुस्ती केली. आणि पांहाट उगवली तेव्हां तो मनुष्य त्यास ह्मणाला, "मला जाऊं दे, कां कीं आतां उजेडलें." यावर याकोबाने उत्तर दिल्हें कीं, "तूं मला आशीर्वाद दिल्यावांचून, मी तुला जाऊं देणार नाहीं." मग तो मनुष्य आशीर्वाद देता झाला, असा कीं, "तुला आजपासून तुझे नांव याकोब नाहीं; परंतु इस्राएल असें तुला ह्मटलें जाईल. (इस्राएल ह्मणजे देवाचा वीर.) कां कीं तूं देवाजवळ व माणसांजवळ समर्थ आहेस, आणि जय पावला आहेस.

त्याच्या नंतर याकोबाने, आपला भाऊ आला, असें पाहून, त्याला भूमीकडे लवून सात वेळां नमन केलें. तेव्हां एसावाने आपल्या भावाच्या भेटीस धावत येऊन, त्याच्या गळ्याला विळखा घालून रडला. नंतर याकोबाच्या बायका व मुलें येऊन, त्यांनीहि एसावास नमन

केलें. एसावाने तीं गुरें ढोरें व मेंढे यांची भेट पहिल्याने नकारली; पण याकोबाने ती त्यापासून फार आग्रहाने घेवविली. मग एसाव आपला मार्ग चालता झाला. आणि याकोब पुनः खनान देशांत आला.

ज्या मनुष्याबरोबर याकोबाने कुस्ती केली, तो कोणी साधारण मनुष्य नव्हता; तो देवाचा पुत्र होता. तो या जगांत मनुष्यांबराबर राहायाला येण्याच्यापूर्वीं, ज्यांचा त्यावर भरवसा होता, त्यानां दुःखापासून सोडविण्याकरितां, अथवा त्यांचा विश्वास बळकट करण्याकरितां कित्येक वेळा मनुष्यरूपें भेटला. या प्रसंगीं त्याने कुस्तीमध्यें त्याला हटविण्याची शक्ति व वरदान मागून घेण्याची शक्ति याकोबाला दिल्ही, या हेतूने कीं सदां सर्वदां त्याच्या भक्तानीं प्रार्थनेमध्यें आशा धरून आग्रह करावा.

---

## गोष्ट १६. योसेफ विकला गेला.

याकोबास हारान देशांत जे मुलगे झाले, त्यांतील अगदीं धाकट्याचें नाव योसेफ होतें, तो राहेलेच्या पोटीं जन्मला होता. नंतर खनान देशांत बारावा जन्मला, त्याचें नांव बेन्यामीन. इस्राएलाची प्रीति दुसऱ्या सर्व मुलांपेक्षा योसेफावर होती. त्याने त्या मुलांस एक सुंदर आंगरखा दिल्हा; हें पाहून त्याचे दुसरे भाऊ त्यासीं द्वेष करूं लागले, आणि त्यासीं मित्रपणाने बोलत नाहींसे झाले. एका रात्रीं योसेफाला स्वप्न पडलें कीं,

ते सर्व शेतांत पेंढ्या बांधीत आहेत त्यासमयीं त्याच्या भावांच्या पेंढ्यानी त्याच्या पेंढीस नमन केलें. जेव्हां हें



त्याचें स्वप्न त्याच्या भावानी ऐकिलें, तेव्हां ते त्याचा अधिकच द्वेष करूं लागले. दुसऱ्या वेळीं तो त्यानां बोलला, "मला दुसरें एक स्वप्न पडलें कीं, सूर्य, चंद्र आणि अकरा तारे, यानी मला नमन केलें." हें ऐकून त्याचा बाप त्याला दटावून बोलला कीं, "मी, तुझी आई, आणि तुझे भाऊ, या सर्वानीहि तुझ्याजवळ येऊन, भुईपर्यंत लवून तुला नमन करावें कीं काय? तथापि याकोबाने या गोष्टी मनांत राखिल्या.

याकोब हिब्रोन एथें राहत असे. तेथून एका दिवसीं त्याने आपला लाडका मुलगा जो योसेफ त्याला कित्येक दिवसाच्या वाटेवर, त्याचे दुसरे मुलगे जेथें मेंढे चारीत

असत तिकडे त्यानां भेटायास पाठविलें. त्याला ते डोथान एथें भेटले. त्याला लांबून पाहून ते एकमेकासीं बोलूं लागले कीं, "तो पाहा, स्वप्न पाहणारा येत आहे. चला आपण त्यास ठार मारूं आणि मग त्याचें स्वप्न कसें आहे तें पाहूं." सगळ्यांत जो वडील रऊबेन या नावाचा होता तो बोलला, "त्याला हातेराने मारूं नये; त्याला या खाड्यांत टाकूं;" कारण त्याच्या मनांत असें होतें कीं, कोणाचे न कळतां आपण त्यास बाहेर काढावें.

त्यानी त्याला खाड्यांत टाकिलें; यानंतर कोणी इस्माएल वंशांतले व्यापारी मिसरदेशास जातांना दृष्टीस पडले. तेव्हां त्यानी त्याला बाहेर काढून त्या व्यापाऱ्यानां वीस रूपयाला विकलें. आणि त्यानी त्याचा आंगराखा काढून घेतला आणि एक करडूं मारून त्याच्या रक्तांत तो आंगरखा बुडवून तो आपल्या बापाजवळ आणून दाखविला, आणि सांगितलें कीं, "हा आंगरखा आह्मास सांपडला. हा तुझ्या मुलाचाच आहे कीं नाहीं हें आतां तूं ओळख." याकोबाने तो ओळखून त्यानां सांगितलें कीं, "होय, हा माझ्या मुलाचाच आहे. कोणी जनावराने त्यास मारून खालें यांत कांहीं संशय नाहीं." यानंतर त्याचे सर्व मुलगे आणि मुली त्याजवळ आल्या आणि त्याचें समाधान करण्याकरितां त्यानी पुष्कळ यत्न केला; परंतु त्याचें समाधान होईना. तो ह्मणाला कीं, "मी माझ्या मुलाचे शोकांतच मरून योसेफाजवळ जाईन.

———

## गोष्ट १७. योसेफ मिसरदेशांत.

त्या व्यापाऱ्यानी योसेफाला मिसर देशास आणून पाहऱ्यावरचा मुख्य जो एक पोटिफार नावाचा सरदार होता, त्याला विकलें. योसेफाचा प्रमाणिकपणा आणि शहाणपणा व ज्या कामांत घातला त्या कामांत देवाने त्यास जय दिल्हें, हें त्याच्या धन्याने पाहून त्याला आपल्या घरांतला मुख्य कारभारी केला आणि कामकाज त्यांच्या स्वाधिन केलें. या प्रकारें योसेफाने दुसऱ्याच्या चाकरींत असतांहि सुख भोगिलें.

पोटिफार याची बायको पतिव्रता नव्हती तिने योसेफाला मोहांत पाडण्याकरितां पुष्कळ यत्न केला परंतु तो ह्मणे कीं, "मी देवाविरुद्ध हें महान् पातक कसें करूं ?"

जेव्हां त्या बायकोने पाहिलें कीं, यास मोहांत पाडायास आपला यत्न चालत नाहीं. तेव्हां तिने खोटा ठपका त्यावर आणिला आणि आपल्या नवऱ्यास सांगितला. तो ऐकून पोटिफाराने योसेफाला तुरंगांत टाकिलें. परंतु योसेफाजवळ देव होतांच, त्याने तुरंगाचा जो अधिकारी त्याच्या मनांत योसेफाविषयीं दया आणिली. मग त्याने सर्व बंदिवानाची देखरेख योसेफाला सांगितली. या प्राकरें योसेफाला तुरंगांत देखील सुखच झालें.

यासमयीं असें झालें कीं, राजाचा मुख्य भाजणारा व मुख्य प्राशनकारी हे दोघे तुरंगांत पडले; आणि त्यांच्या देखरेखीचें काम योसेफाकडे होतें. त्याने त्या दोघांना एका सकाळीं फार दुःखी असें पाहून विचारि-

लें कीं, "तुह्मी आज असे दुःखी कां दिसतां?" त्यावर त्यानीं उत्तर केलें कीं, "आह्मा दोघांला गेल्या रात्रीं विचित्र स्वप्नें पडलीं; आणि त्याचा अर्थ समजावून सांगणारा कोणी नाहीं, ह्मणून दुःखी आहों." हें ऐकून घेऊन योसेफानें उत्तर केलें कीं, "अर्थ दाखविणें हें देवाचें नव्हेत काय? बरें कृपा करून मला तीं स्वप्नें तर सांगा." मग तो प्राशनकारी आपलें स्वप्न सांगता झाला; "मी स्वप्नांत असें पाहिलें कीं, माझ्यापुढें एक द्राक्षाची वेल होती आणि त्या वेलीला तीन धुमारे फुटले होते; आणि त्या वेलीला कळ्या आल्या व फुलवरा येऊन त्याच्या घडानीं द्राक्षें पिकवलीं. माझ्या हातांत फारो राजाचा पेला होता, त्यांत तीं द्राक्षें मी पिळून तो पेला राजाच्या हातांत दिल्हा." हें स्वप्न ऐकून घेऊन योसेफानें त्याचा अर्थ सांगितला. तो असा कीं, "तीन धुमारे जे पाहिलेस ते तीन दिवस होत. आजपासून तीन दिवसाच्या आंत फारोराजा तुला तुरंगांतून बाहेर काढून तुझी जागा पुनः तुला देईल. आणि पूर्वीं जसा तूं प्राशनकारी होतास आणि फारोच्या हातांत पेला देत असस, तसा पुढें देसील; परंतु तुझें बरें होईल तेव्हां माझी आठवण असूं दे; आणि कृपा करून मजविषयीं फारोला कांहीं सांगून मलाहि या बंदिखान्यांतून सोडीव.

जेव्हां मुख्य प्राशनकारीच्या स्वप्नाचा असा चांगला अर्थ मुख्य भाजणाऱ्यानें ऐकिला, तेव्हां तोहि आनंदानें आपलें स्वप्न सांगूं लागला. तें असें कीं मी, असें पाहिलें कीं, तीन पांढऱ्या टोपल्या आपल्या डो-

क्यावर घेऊन जात होतों; त्यांतून अगदीं वरच्या टोपलींत फारोकरितां भाजलेले पदार्थ होते, ते त्या टोपलींतून पांखरानीं खाल्लें." हें ऐकून योसेफाने त्याच्याहि स्वप्नाचा अर्थ सांगितला कीं, "तीन टोपल्या ते दिवस होत; यावरून असें दिसतें कीं, तुला आजपासून तीन दिवसानी फारो फाशीं देईल, आणि तुझें मांस पांखरें खातील.

तिसऱ्या दिवशीं फारोच्या जन्मदिवसाचा समारंभ होता, तेव्हां त्याने त्या दोन बंदिवानाची आठवण धरिली आणि मुख्य प्राशनकाऱ्याला आपल्या जागेवर पुनः आणिलें; परंतु भाजणाऱ्याला योसेफाने स्वप्नाचा अर्थ सांगितला होता त्याप्रमाणें फाशीं दिल्हें. तो मुख्य प्राशनकारी आपल्या जागेवर गेल्यानंतर योसेफाचा उपकार विसरला आणि त्याजविषयीं फारोजवळ कांहीं बोलला नाहीं; ह्मणून योसेफाला अणखी दोन वर्षें तुरंगांत राहावें लागलें. सुटकेची उत्तम वेळ देवावांचून कोणाला ठाऊक नसती.

दोन वर्षांनंतर फारोला स्वप्न पडलें आणि त्याजवळ त्या स्वप्नाचा अर्थ सांगणारा कोणी नव्हता. त्यासमयीं त्या मुख्य प्राशनकाऱ्याला आपल्या वचनाचें स्मरण झालें. त्याने राजाला सांगितलें कीं, "तुरंगांत एक तरूण मनुष्य आहे त्याने माझ्या आणि मुख्य भाकरवाल्याच्या स्वप्नांचा अर्थ मोठ्या शहाणपणाने सांगितला. राजाने योसेफाला त्या क्षणींच बोलावणें पाठवून आपल्या समोर आणिवला. मग राजाने त्याला सांगितलें कीं, "मला एक स्वप्न पडलें आहे आणि

त्याचा अर्थ सांगेसा कोणी नाहीं; परंतु मी असें ऐकिलें आहे कीं, तुला स्वप्नाचा अर्थ सांगतां येतो." हें ऐकून त्याने उत्तर केलें कीं, "मला कळत नाहीं; पण राजा, शांत अस; देवच तुला सांगेल." नंतर राजाने आपलें स्वप्न सांगितलें, तें असें कीं, "मी, नदीच्या कांठीं (ह्मणजे नील नदी मिसरदेशांत आहे तिच्या) उभा राहून पाहिलें कीं, त्या नदींतून सात गायी सुंदर पुष्ट अशा निघाल्या; आणि त्या एके शेतार्डींत चरूं लागल्या; आणि दुसऱ्या सात गरीब रोडक्या आणि कुरूपी अशा त्यांच्या नंतर त्याच नदींतून निघाल्या. अशा कुरूपी, रोडक्या व वाईट गायी, मी या मिसरदेशांत कधींहि पाहिल्या नव्हत्या. आणि दुसरें असें पाहिलें कीं, त्या रोडक्या गायींनी, पहिल्या सुंदर गायींनां खाल्लें; परंतु जरी त्यांनीं त्यांला खाल्लें तरी त्यांच्या अंगावर कांहींच पुष्टता आली नाहीं; त्या पहिल्याचप्रमाणें रोडक्या व कुरूपी दिसत होत्या. इतकें पाहून मी जागा झालों. यानंतर दुसरें एक स्वप्न मला पडलें, त्यांत मी असें पाहिलें कीं, एक्या देठावर पूर्ण भरलेल्या आणि चांगल्या अशा सात लोंबी होत्या. आणि दुसरा काय चमत्कार पाहिला तो ऐक; दुसऱ्या सात सुकलेल्या व पूर्वेकडील वाऱ्याने करपलेल्या होत्या त्या उगवून त्या चांगल्या भरलेल्या लोंबी गिळून टाकिल्या.

असें ऐकून योसेफ फारोस ह्मणाला, "राजा, देव जें करणार आहे, त्याविषयीं तुझीं स्वप्नें आहेत. ज्या सात गायी त्वां पाहिल्या आहेस, तीं सात वर्षें होत. आणि सात चांगल्या लोंबी पाहिल्यास, तींहि सात वर्षें होत.

आणि स्वप्नांचा एकच अर्थ आहे. आणि तसेंच सात रोडक्या गायी तीं तरीं सात वर्षें आहेत. व सात रिक्त लोंबी तीं सात दुकाळाचीं वर्षें असें समज. राजा, मी तुला ह्मटलें कीं देव जें करणार आहे त्याविषयीं हीं स्वप्नें आहेत, तें खरें आहे; आणि पाहा कीं, तसेंच होईल. सात वर्षें सर्व मिसर देशांत धान्य पुष्कळ पिकून सुखाचीं जातील; नंतर सात सालें मिसरदेशांत जिकडेतिकडे दुकाळ पडून सर्वांचे फार हाल होतील. फारोला एकच स्वप्न दोन वेळां पडण्याचें कारण हें आहे कीं, असी गोष्ट देवाने खचीत ठरविली आहे आणि कांहींका वेळाने तसें घडून येईल. ह्मणून राजा त्वां आतां असें करावें कीं, एक शहाणा विचारवंत मनुष्य पाहावा आणि त्यास सर्व मिसरदेशाचा मुख्य नेमावा. तसेंच दुसरे कारभारी नेमून या देशच्या जमिनीचा पांचवा भाग सात सुपीक सालांत आपल्याकडे घ्यावा. या सात वर्षांत जें धान्य पिकेल, तें कारभाऱ्यानी तुझ्या स्वाधीन करावें व त्यानी शहरोशहरीं धान्यसंग्रह करून ठेवावा. ह्मणजे पुढें सात सालें दुकाळ या देशांत पडणार आहे, त्या वेळीं हें संग्रह केलेलें धान्य उपयोगी पडेल आणि देश ओस पडणार नाहीं.

फारो हा स्वप्नाचा अर्थ व योसेफाने केलेला सुबोध ऐकून ह्मणाला, "यासारिखा ज्यांत देवाचा आत्मा आहे असा आह्मांला कोठें मिळणार आहे?" यानंतर फारोने योसेफास त्या सर्व देशाचा अधिकारी केलें; आणि त्याला सांगितलें कीं, "तुझ्या व माझ्या थोरपणांत एवढाच भेद कीं, तक्तावर बसणारा मात्र मी. वरकड अ-

धिकारांत तूं आणि मी सारिखाच." असें ह्मणून फारो राजाने आपल्या हातांतली आंगठी काढून योसेफाच्या हातांत घातली, आणि त्याला बहु मोलाचा पोषाख पेरायास दिल्हा, व त्याच्या गळ्यांत सोन्याची सांखळी घातली, आणि आपला जो दुसरा रथ त्यांत त्याला बसविलें; आणि "ढोपे लववा" असा शब्द करून चाकर त्याच्या पुढें धावावे ह्मणून राजाने आज्ञा केली. तेव्हां योसेफाला फारोने सांगितलें कीं, "तुझ्या हुकुमावांचून या सर्व मिसर देशांत कोणी आपला हात किंवा पाय हालवूं नये."

या प्रकारें योसेफास देवाने त्याच्या बापाच्या घरांतून खाड्यांत, खाड्यांतून गुलामगिरींत, गुलामगिरींतून तुरंगांत, तुरंगांतून राजवाड्यांत आणिलें. योसेफ मिसरदेशांत विकला गेला, तेव्हां त्याचें वय सत्रा वर्षांचें होतें. आणि जेव्हां त्यास राजदरबारांत अधिकार मिळाला, तेव्हां तो तीस वर्षांचा होता.

---

## गोष्ट १८ योसेफाचे भाउबंद मिसरदेशीं येतात.

जसें देवाने भविष्य सांगितलें होतें, तसेंच घडून आलें. सात सालें सुपीकाचीं आलीं; आणि सर्व मिसरदेशांतील जमिनींच्या उत्पन्नाचा पांचवा भाग योसेफाने एकत्र जमविला. तें धान्य इतकें जमलें कीं, त्याच्या मोजण्याचें काम टाकून द्यावयास त्यांनां अगत्य पडलें. भविष्यांत सांगितलेल्याप्रमाणें सात वर्षें दुकाळहि पडायास चुकला नाहीं. आणि त्यांतील पहिल्या सालीं आसपासच्या प्रांतीं इतका मोठा दुकाळ पडला कीं,

तेथील सर्व लोक मिसरदेशांत योसेफापासीं धान्य वि-
कत घेण्याकरितां आले.

असाच खनान देशींहि दुकाळ पडला, तेव्हां इस्रा-
एल आपल्या मुलानां ह्मणाला, "तुह्मी एकमेकाकडे असें
कां पाहातां? ऐका, मी तुह्माला सांगतों. मी असी बा-
तमी ऐकिली आहे कीं, मिसरदेशांत धान्य आहे. तुह्मी
तेथें जाऊन आपल्याकरितां धान्य विकत आणा; तरच
आपण वांचूं; नाहीं तर मरूं." मग दाहा भाऊ धान्य
खरीदी करण्याकरितां मिसरदेशास गेले; बन्यामीन
एकटाच आपल्या बापाजवळ राहिला. ते योसेफाज-



वळ आले आणि हा कोणी देशपति आहे, असें समजून
त्याच्या पायीं पडले. त्याने त्यानां जरीं ओळखिलें, तरीं
परक्यासारिखी त्यांच्यासीं वर्त्तणूक केली. तो त्यांसीं

स्वतः बोलला नाहीं; परंतु आपण मिसरी भाषेंत कठोर शब्दाने दुभाष्याकडून त्यांसीं बोले. ते येताक्षणींच पहिल्याने त्याने त्यांस हा प्रश्न केला, "तुह्मी कोठून आलां?" त्यानी उत्तर केलें कीं, "आह्मी खनान देशांतून धान्य विकत घेण्याकरितां आलों आहों." यानंतर, योसेफ ह्मणाला कीं, "तुम्ही हेर आहां, तुम्ही देशाची उघडीक पाहाण्याकरितां आलां आहां." यावर त्यानी उत्तर दिल्हें, "महाराज, आह्मी या हेतूने आलों नाहीं; परंतु आह्मी तुमचे दास धान्य विकत घेण्याकरितां आलों आहों. आह्मी सर्व एका पुरूषाचे मुलगे आहों. आह्मी प्रमाणिक मनुष्य आपले दास आहों. आह्मी सर्व भाऊ बारा; खनान देशांतल्या गृहस्थाचे लेंक आहों; आह्मांतील एक जण बापाजवळ राहिला आहे." मग योसेफ त्यानां ह्मणाला कीं, "तुह्मी खरें बोलतां कीं खोटें बोलतां, हें स्पष्ट कळावें ह्मणून तुह्मांतील एक जणाने जाऊन तुमच्या भावाला आणावें, आणि बाकी जण तुह्मी बंदिखान्यांत राहा."

मग त्याने त्या सर्वांस पहाऱ्यांत तीन दिवसपर्यंत बसविलें. तिसऱ्या दिवसीं तो पुनः त्यानां आपल्याजवळ आणवून असें ह्मणाला कीं, "मी देवाला भिवून चालतों ह्मणून माझें ऐकून आपल्या प्राणाचें तुह्मी यावेळेस रक्षण करा. तुह्मांतून एका जणाला एथें असूं द्या. बाकी सर्व हें तुह्मी विकत घेतलेलें धान्य आपल्या घरीं घेऊन जा. तुमच्यांत जो अगदीं लहान, त्याला एथें घेऊन या, ह्मणजे तुझ्या वचनाचें खरेंपण दिसेल आणि तुमचे प्राण वांचतील." मग ते भाऊ एकमेकांसीं

आपल्या भाषेंत बोलले, “खरोखरी आपल्या भावाचे अपराधी आहों. त्याचा प्राण व्याकुळ होई तोंपर्यंत त्याने आपली प्रार्थना केली, पण आपण कांहींच लक्ष दिल्हें नाहीं. ह्मणून ही विपत्ति आपल्यावर येऊन पडली.” हें त्यांचें बोलणें योसेफाला समजलें असें त्यांस कळूं आलें नाहीं, तो मिसर देशांतला आहे असें त्यांस वाटलें. तो तर त्यांचें ऐकून एकांतीं जाऊन रडला; मग त्याने त्यांदेखतां शिमोनाला बांधून तुरंगांत परत पाठविलें. मग ते बाकीचे भाऊ खनानांत याकोबापासीं परत गेले. परंतु ह्या सर्व गोष्टी जेव्हां त्यांच्या ह्मातार्‍या बापाने ऐकिल्या तेव्हां तो फार दुःखी होऊन बोलला, “तुह्मी माझे मुलगे माझ्यापासून नेलेत; योसेफ नाहीं, आणि बन्यामीन न्यायास इच्छितां. या सर्व गोष्टी मला प्रतिकूळ आहेत. मी तुह्माला साफ सांगतों कीं, बन्यामीनाला मी तुमच्या बरोबर पाठवीत नाहीं.”

---

## गोष्ट १९. योसेफाच्या भाऊबंदाची दुसरी खेप.

खनान देशांत फारच दुकाळ पडला होता ह्मणून याकोबाच्या मुलानां फिरूनहि मिसर देशांत यावें लागलें. बन्यामीनाला त्यांबरोबर पाठविण्याचें फारकरून याकोबाच्या मनांत नव्हतें; पण उपाय नाहीं ह्मणून त्याने त्यास पाठविलें, आणि खनान देशांतील फार चांगले असे पदार्थ भेट नेण्याकरितां त्यांजबरोबर दिल्हे. त्या पदा-

थांचीं नांवें, डीक मध सुगंधद्रव्य व बोळ, पिस्ते व बदाम. मग याकोब देवाची प्रार्थना करून त्यांस म्हणाला, "जा तर आतां. त्या मनुष्याच्या मनांत सर्वशक्तिमान देवाने तुम्हाविषयीं दया आणावी आणि त्याने बन्यामीनाला व तुमच्या दुसऱ्या भावाला तुम्हाबरोबर पाठवावें. जर नाहीं तर उपाय नाहीं."

जेव्हां योसेफाला ते आले असी बातमी समजली तेव्हां त्याने त्यांस आपल्या समोर बोलावून आणिलें आणि त्यांसीं ममतेनें बोलून त्यांस विचारिलें, "तुमचा म्हातारा बाप खुशाल आहे? तुमचा अगदी धाकटा भाऊ तो हाच कीं काय? मुला देव तुजवर दया करो." बन्यामीनाला पाहून परकीपणाचें ढोंग करावयास त्याला फार कठीण पडलें. त्याच्या पोटांत भावांवरचा कळवळा आला, आणि तो आपल्या खोलींत जाऊन रडला.

नंतर तो तोंड धुऊन त्यांजवळ पुनः बाहेर आला आणि मग त्याने आपणाला आखळिलें व त्यास आपल्या बरावर जेवायाला बोलाविलें. जेवणाच्या वेळेस तो त्या देशांतल्या चालीप्रमाणें एका मेजाजवळ बसला व तें निराळ्या मेजाजवळ बसले. ते तर आपापल्या वयाप्रमाणें बसविलेले असे असतां त्यांस मोठे आश्चर्य वाटलें. आणि सन्मान झाल्यामुळें त्यांनां फार हर्ष झाला.

योसेफाने आपल्या चाकरांस आज्ञा केली कीं त्यांच्या गोण्या धान्यानीं भरा, आणि एकेकाचा पैका त्याच्या गोणीच्या तोंडांत ठेवा. आणि बन्यामिनाच्या

गोणींत माझा रूप्याचा पेला घाला. ते मार्गस्थ होऊन योसेफाने लवकर आपला कारभारी त्यांच्या मागों पाठ धाडला. तो त्यांजवळ येऊन बोलला, "तुमचें आह्मी बरें केलें असतां तुह्मी आमचें अनहित करून कां जातां?" ते भाऊ एकमेकाच्या तोंडाकडे पाहून त्याच्या बोलण्याचा काय अर्थ तो समजले नाहींत. हें पाहून तो बोलला, "माझ्या बोलण्याचा काय अर्थ तो आतां मी तुह्मास सांगूं काय? माझ्या यजमानाच्या प्यावयाचा रूप्याचा पेला कोणी चोरिला आहे तो सांगा." हें भाषण ऐकून ते सर्व ह्मणाले, माहराज, आपण असें कसें आह्माला बोलतां? आह्मी भले मनुष्य आहों. बरें, ज्यापेक्षां आपल्या मनांत आमचा वहमा येतो, त्यापेक्षां आमचा झाडा घ्या आणि ज्याजवळ तो पेला सांपडेल त्याला जिवें मारा; आणि आह्मी यजमानाचे गुलाम होऊं." यानंतर सर्व गोण्या फोडून पाहिल्या तेव्हां पेला बन्यामीनाच्या गोणींत सांपडला. मग ते आपलीं वस्त्रें फाडीत त्या शहरांत परत आले. ते फिरून योसेफाजवळ नेले असतां त्याने त्यांस रागाने प्याल्याविषयीं विचारिलें. त्यावर उत्तर देण्यास यहूदा पुढें होऊन बोलतो, "माहाराज आपणासीं आह्मी काय बोलावें? या ठपक्यांतून आह्मी कसें सुटावें? आह्माला कांहीं तोड सुचत नाहीं. ज्यापेक्षां देवाने आमचा अपराध उघड केला आहे त्यापेक्षां आह्मां सर्वांना आपण आपले बंदे चाकर करा." हें ऐकून योसेफाने उत्तर दिल्हें, नाहीं. "मजपासून असी गोष्ट व्हावयाची नाहीं. ज्याच्या गोणींत पेला सांपडला, त्यालाच मी चाकर करीन.

आणि तुह्मी खुशाल आपल्या बापाकडे जावें." मग यहूदाने योसेफाची फार विनंती केली, आणि मधुर भाषेने प्रार्थना केली कीं, "असें करूं नका. कां कीं आह्मी बापाजवळ जाऊं तेव्हां जर त्याने पाहिलें कीं हा आमच्या बरोबर नाहीं तर तो प्राण सोडील, कारण कीं याच्या प्राणासीं त्याचा प्राण बांधला आहे. याप्रकारें आमचा बाप आमच्या योगेकडून ह्मातारपणीं दुःखांत मरेल. आणि दुसरें कारण असें कीं, मी याकरितां आपल्या बापाजवळ जामीन होऊन बोललों कीं जर मी याला हजीर न केलें तर तुझा ठपका मजवर सदैव राहावा. ह्मणून मी आपणास विनंती करितों, त्याच्या बद्दल मला आपला बंदाचाकर करा आणि त्या मुलाला त्याच्या भावांबरोबर जाऊं द्या. कांकीं त्यावांचून जर मी त्या भावांबरोबर गेलों आणि माझ्या बापाने प्राण सोडिला तर मी काय करूं!"

हें ऐकून योसेफास गहिंवर आवरला नाहीं. तो मोठ्याने ओरडून ह्मणाला कीं, "सर्व मिसर देशच्या लोकानी बाहेर जावें." आपण आपल्या भावांना ओळख देत आहे, त्यावेळीं कोणी परकी जवळ असावा असी त्याची इच्छा नव्हती. नंतर सर्व बाहेर गेल्यावर तो मोठ्याने रडत रडत बोलला कीं "मी योसेफ आहें. माझा बाबा अजून जीवंत आहेना?" हें ऐकून त्याच्या भावांच्या तोंडांतून एक शब्दहि निघेना; कांकीं त्यासमोर ते फार भयाभीत झाले. त्यांच्या मनांत लाज, भीति, आणि आश्चर्य व आनंद एकदांच उत्पन्न होऊन ते दगड झाल्यासारिखे ठास राहिले. मग त्याने आपल्या भावांला

हाक मारून जवळ बोलाविलें; तेव्हां ते त्याच्याजवळ आले. तरीं त्यांच्या तोंडांतून एकहि शब्द निघेना. हें पाहून तो ह्मणाला कीं, "ज्याला तुह्मी मिसर देशांत विकलें होतें तो मी योसेफ आहे. ह्मणून आतां तुह्माला एथें खेद पावण्याची व आपल्या स्वतांवर रागे भरण्याची कांहीं गरज नाहीं. कांकीं देवाने मला तुमच्या अगोदर जीव बचावण्याकरितांच पाठविलें असें माना. बरें असो; आतां बापाजवळ जाऊन सर्व एथील तुह्मी पाहिलेली माझी मानप्रतिष्टा सांगा आणि त्याला एथें घेऊन या."

मग योसेफ बन्यामीनाच्या गळ्याला विळखा घालून रडला. तसाच तोहि त्याच्या गळ्यास विळखा घालून रडला. सर्वांचेहि त्याने मुके घेतले; नंतर ते भाऊ त्याजसीं बोलले. फारो राजाने स्वतां त्या ह्मातार्‍या याकोबास बोलावणें पाठविलें. आणि योसेफाने त्याला वाटेंतून येण्याकरितां गाड्या आणि उंच किमतीच्या पदार्थांची भेट पाठविली.

नंतर जेव्हां योसेफाचे भाऊ जायास निघाले तेव्हां तो त्यांस ह्मणाला, "वाटेंत चेष्टा करूं नका." याप्रकारें ते आनंदयुक्त खनानास परत गेले.

---

## गोष्ट २० याकोब मिसर देशास जातो.

ते याकोबाजवळ येऊन सांगते झाले कीं, "आमचा भाऊ योसेफ अझून जीवंत आहे, आणि तो सर्व मिसर

देशाचा अधिकारी झाला आहे." परंतु हें त्याचें बोलणें याकोबाने खरें मानलें नाहीं, कां कीं त्याला तें अगदी विपरीतसें वाटलें. परंतु जें सर्व योसेफ त्याच्याजवळ बोलला होता तें जेव्हां त्यानी सांगितलें, आणि त्याने पाठविलेल्या गाड्या त्याच्या दृष्टीस पडल्या, तेव्हां त्याला हिंमत आली आणि मोठ्याने ओरडून बोलला, "माझा मुलगा योसेफ जिवंत आहे एवढेंच पुरें. मी मरायाच्यापूर्वीं त्याला भेटायास जाईन."

मग याकोब आपले मुलगे, नातू, एकंदर सासष्ट, व सर्व सामान बरोबर घेऊन मिसर देशास गेला. इकडे योसेफ आपल्या रथांत बसून आपल्या बापास सामोरा गेला. त्याने आपल्या बापास पाहिलें, तेव्हां तो त्याच्या गळ्याला विळखा घालून पुष्कळ वेळपर्यंत रडला.

मग इस्राएल योसेफास बोलला, "आतां मला मरण येवो, कां कीं तुला भेटावें एवढाच माझा हेत होता. योसेफाने आपल्या बापास फारो राजाजवळ नेलें. राजाने याकोबाला विचारिलें कीं, "तुला किती वर्षें आहेत?" यावर त्याने उत्तर केलें कीं, "मला एकशें तीस वर्षें आहेत. माझ्या आयुष्याचे दिवस थोडके व क्लेशाचे होत झाले आणि माझ्या पितरांच्या दिवसाइतके झाले नाहींत." मिसर देशांत म्हातारा याकोब सत्रा वर्षें राहिला. जेव्हां तो मरायाला टेंकला, तेव्हां योसेफ आपले दोघे मुलगे एफ्राइम आणि मनास्से यांसहित त्यास भेटायास आला. त्या वेळीं इस्राएल योसेफास बोलला "योसेफा, तुझें तोंड माझ्या दृष्टीस पडेल असें मला वा-

टलें नव्हतें; परंतु पाहा, देवाने असें केलें कीं, तुझीं मुलेंहि माझ्या दृष्टीस पडलीं." योसेफाने आपले मुलगे आपल्या बापासमोर आणिले. मनांत कीं त्याने मस्तकीं हात ठेवून त्यानां आशीर्वाद द्यावा. इस्राएलाने धाकटा एफ्राइम त्याच्या मस्तकीं उजवा हात ठेविला मनास्से जो पहिल्याने जन्मलेला त्याच्या मस्तकावर डावा हात ठेविला. आणि दोघानां आशीर्वाद देऊन ह्मणाला, "ज्या देवाच्या सांगण्याप्रमाणें माझे पूर्वज आब्राहाम व इझाक चालले, ज्या देवाने मला जन्मापासून आजपर्यंत खायाला घातलें, ज्या देवदूताने मला सर्व दुःखापासून सोडविलें, त्याचा आशीर्वाद या मुलांवर असो. आणि माझें व माझ्या पूर्वजाचें नाव यानां असो." या प्रकारें त्याने आपल्या पुत्राच्या बरोबरीचे हक्क त्यानां दिल्हे. आणि त्या दोघांपासून दोन इस्राएल लोकांचे वर्ण झाले. अणखी तो ह्मणाला कीं, "इस्राएलांतला जो कोणी आशीर्वाद देईल, त्याने असे ह्मणावें कीं, देव तुह्माला एफ्राइम आणि मानास्से यासारखें करो." नंतर याकोबाने प्राण सोडतेवेळेस आपल्या सर्व पुत्रांला जवळ एकत्र बोलावून प्रत्येकास एकएक तऱ्हेचा आशीर्वाद दिल्हा. नंतर त्याने आंथरूणावर पडून प्राण सोडिला. मग योसेफ व त्याचे भाऊबद पुष्कळ मिसर देशच्या लोकांसहित व पुष्कळ तुरूकस्वार व रथ बरोबर घेऊन मोठ्या समारंभाने आपल्या बापाचें प्रेत खनान देशांत माखपेलाच्या गुहेंत जेथें आब्राहामाचें थडें होतें तेथें नेऊन पुरलें. जेव्हां ते परत मिसर देशांत आले, तेव्हां योसेफाचे भाऊ यो-

सेफाला भ्याले; कां कीं त्यानां वाटलें कीं आपला बाप मेला आतां आपण योसेफाला जें दुःख दिल्हें होतें त्याचें तो सूड उगवील. परंतु योसेफ त्यांस ह्मणाला, "तुह्मी भिऊं नका, कांकीं मी देवाच्या ठिकाणीं आहे कीं काय? तुह्मी जें माझ्या वाईटाकरितां केलेंत तेणेकरून देवाने माझें बरें केलें, कसें तें पाहा कीं बहुत लोकांचे जीव माझ्या हातून वांचले."

योसेफ आपल्या भावाला ओळख देण्यापूर्वी इतक्या कठोरपणाने व उशीराने कां वागला, याचें कारण आतां समजलें असेल. त्यानी दुःख दिल्हें ह्मणून आपण त्याला दुःख द्यावें असा विचार त्याच्या मनांत कांहीं नव्हता. परंतु एकमेकासीं बापासीं आपणासीं त्यांचा स्वभाव कसा आहे, हें समजावें ह्मणून त्याने असें वर्त्तिलें. हें समल्यावांचून त्याच्याने त्यांचें वास्तवीक कल्याण करविलें नसतें. या प्रकारें योसेफ मिसरदेशांत आपल्या भावासहित सुखाने राहिला. आणि त्याच्या डोळ्या देखतां त्याला नातू व पणतूहि झाले.

योसेफाच्या गोष्टीवरून मोठ्या शिक्षा मिळतात. देव आपलीं दयेचीं कामें सिद्धीस नेण्याकरितां लोकांच्या दुष्टपणाच्या युक्ती कशा रद्द पाडितो, याचें उदाहरण ही गोष्ट दाखविती. योसेफाच्या भावानीं जेव्हां पहिल्याने त्याला खाड्यांत टाकिलें व मग कांहीं वेळाने इस्माएली लोकांला विकलें, तेव्हां त्यांच्या मनांत त्याचा घात करण्याचें होतें. परंतु देवाने त्या घातक कर्माच्याच योगाने दुकाळांत त्यानां व त्यांच्या कुटुंबाला जिवंत राखिलें; कारण कीं, त्याच्या कुळांत दिव्य तार-

णारा जन्मास यावयाचा होता. त्यांची असी वाईट वर्त्तणूक असावी असी देवाची इच्छा नव्हती. ही त्यांची वाईट वर्त्तणूक, जसी मागील गोष्टींत सांगितलेला काइन याने मनांतील द्वेषाने आबेलास जिवें मारिलें तसीच झाली.

ह्मणून आपण सावधगिरी राखून गर्व आणि मत्सर आपल्यामध्यें उत्पन्न होऊं देऊं नये. कारण कीं जर हे दोन वाईट गुण आपल्यांत असले तर खचीत जाणावें कीं आपल्यावर देव प्रीति करणार नाहीं. या गोष्टीवरून आपण समजावें कीं देव जर आपला पाठराख्या असला तरच आपल्याला सुख मिळेल. पाहा कीं योसेफाजवळ देव होता ह्मणून तो तुरंगांतहि सुखच पावला. आणि नेमलेल्या योग्य वेळीं त्याचे जे शत्रू होते ते मित्र होऊन त्याला संसारचीं सुखेंहि मिळालीं. जर आपल्याला योसेफासारिखें सुख याची इच्छा असली तर त्यासारिखी वर्त्तणूक केली पाहिजे. सदांसर्वदां आपल्या ध्यानींमनीं देव असूं द्यावा. जेव्हां आपण पातक करायाला मोहीत होऊं तेव्हां आपण आपल्यासीं ह्मणावें कीं, "हें महापातक कसें आचरावें ? येणेकरून देवाचा राग आपल्यावर होणार नाहीं काय ?" या योसेफाच्या गोष्टीवरून आह्माला प्रभु येशू ख्रीस्त जो आमचा तारणारा त्याची आठवण पडती. पाहा कीं त्याची गोष्ट तरी असीच आहे, कीं तो दगलबाजीने आपल्या वैऱ्याच्या हातीं दिल्हा गेला मग त्यानीं त्याला मेंढ्याप्रमाणें आपला जीव अर्पण देण्याकरितां नेला. आणि तो अ-

र्पिला गेला येणेकरून आह्माला सर्वकाळचें जीवन प्राप्त होतें.

---

## गोष्ट २१. योब याची परीक्षा.

त्या वेळेस योब या नावाचा मोठा द्रव्यवान व मोठा धार्मिक असा एक मनुष्य होता. सर्व लोक त्यावर प्रीति करीत व त्यास मान देत असत. तो खनान देशांत अथवा मिसर देशांत राहत नव्हता. तो आतां ज्या देशाला अरबस्थान ह्मणतात, त्या देशाच्या अज नामें भागांत राहत होता. त्याला सात पुत्र व तीन कन्या होत्या. तीं एकमेकाच्या घरीं सणाच्या दिवसीं केव्हां केव्हां येत असत. नंतर योब दुसऱ्या दिवसीं मोठे सकाळीं उठून आपल्या मुलास बोलावी आणि त्याजकरितां प्रायश्चित्ताचा बळी अर्पण करी. असें करण्याचा अर्थ हा कीं, त्याजकडून कदाचित् पाप घडलें असेल.

सैतानाने योब यावर असा दोषारोप आणिला कीं, योब याचा धर्म केवळ स्वहित साधण्याचा आहे; आणि ईश्वराने त्याचें कल्याण केलें आहे ह्मणून ईश्वराची तो सेवा करितो. तो खरोखर ईश्वराची सेवा करितो कीं नाहीं, ही त्याची प्रचीत पाहण्याकरितां ईश्वराकडून सैतानाला अधिकार मिळाला. ईश्वराने त्याला योबाजवळ जें होतें, तें नेऊं दिल्हें; परंतु त्याकडून योबास पिडवूं दिल्हें नाहीं.

एका उत्साहाच्या दिवसीं त्याचीं मुलें आपल्या व-

डिल भावाच्या घरीं मेजवानीस बसलीं होतीं, इतक्यांत योबाजवळ एक जासूद आला आणि ह्मणूं लागला, "बैल नांगरीत होते आणि त्याजवळ गाढवें चरत होतीं आणि शेबा लोकानी दरोडा घालून त्यांना हरून नेलें आणि गडी तरवारीने हाणले आहेत. आणि तुला वर्तमान सांगायास मी मात्र एकटा सुटून आलों आहें." तो जासूद हें सांगत आहे, इतक्यांत दुसरा तेथें आला. त्याने पहिल्यापेक्षां फार वाईट बातमी आणिली. तो ह्मणाला," देवाग्नीने आकाशांतून पडून मेंढरांला आणि गड्यांला जाळून नष्ट केलें आहे. मी मात्र एकटा त्यांतून वांचून तुला सांगायास आलों आहें."

दुसऱ्या जासुदाचें बोलणें संपलें नाहीं, इतक्यांत तिसरा तेथें आला, आणि ह्मणूं लागला, "खाल्दी लोकानी तीन टोळ्या केल्या आणि उंटावर दरोडा घालून तीं हरून नेलीं आहेत आणि तरवारीने गड्यास हाणलें आहेत. मी एकटा मात्र सुटून तुला सांगायास आलों आहे."

परंतु यापेक्षां अति दुःखाची बातमी अझून यावयाची होती. चवथा जासूद येऊन ह्मणाला, "तुझे मुलगे आणि मुली आपल्या वडील भावाच्या घरीं जेवीत व द्राक्षरस पीत होत्या इतक्यांत जंगलांतून मोठा वारा आला, आणि त्या घराच्या चोहों कोंपऱ्यास लागला. तेव्हां तें त्या तरण्यांवर पडलें आणि तीं मरण पावलीं. मी मात्र एकटा त्या संकटांतून सुटलों आणि तुला सांगायास आलों आहे.

योब जो पूर्वी मोठा द्रव्यवान् व सुखी होता, तो आ-

तो अगदीं गरीब झाला, व त्याचीं सर्व मुलें मेलीं.

अशा विपत्तींत त्याने काय केलें, तर त्याने उठून आपला झगा फाडला आणि क्षौर केलें (दुःख दाखवण्याची त्या वेळेस लोकांची असी रीत होती.) आणि तो जमिनीवर पडून ईश्वराची भक्ति करून ह्मणाला, "प्रभूने दिल्हें आणि प्रभूने परत घेतलें ; त्याचें नाम सुवंदित असो." ईश्वराने त्यावर हीं संकटें कां आणलीं हें त्यास ठाऊक नव्हतें. परंतु हें त्याला ठाऊक होतें कीं पहिल्याने ईश्वराने त्यास सर्व वस्तू दिल्या होत्या आणि जेव्हां त्यास बरें दिसलें, तेव्हां त्या माघारें घ्यावयास त्यास अधिकार आहे.

परंतु सैतान अजूनहि योबावर दोषारोप आणून ह्मणूं लागला कीं, जर योबाच्या देहांतच पीडा झाली, तर तो ईश्वरास शापील. मग ईश्वराने सैतानाकडून योबाला पिडवूं दिल्हें. परंतु इतकें मात्र निवारण केलें कीं "त्याचा प्राण घेऊं नये." मग सैतानाने योबाच्या अंगावर पायाच्या तळव्यापासून डोक्यापर्यंत दुखापत उबळी उठवलीं. आणि तेणेकरून योबास केवळ वेदना होत इतकेंच नाहीं, परंतु त्याचे मित्रहि यांस कंटाळवाणा असा झाला. तथापि योब असें ह्मणे कीं, "जसें ईश्वराच्या हातून आपण चांगलें घेतों तसें वाईट कां घेऊं नये ?

---

## गोष्ट २२. योब व त्याचे मित्र.

योबाच्या संकट समयीं त्याचे तीन मित्र त्याचा समा-

चार ध्यावयास व त्याचें समाधान करायास आले. त्याची भयंकर स्थिति पाहून त्यांस फार वाईट वाटलें. त्याचें शरीर इतकें बदलून गेलें होतें कीं, तो त्यांस ओळखवेना. मग दुःख दाखविण्याकरितां त्यांनी आपले झगे फाडले व आपल्या डोक्यावर धूळ उडवून घेतली. असे त्याजवळ सात दिवस बसले होते. त्यांतून कोणी एक शब्द बोलला नाहीं; कारण योबाला फार दुःख झालें आहे असें त्यांनी पाहिलें. मग जेव्हां योबास वाटलें कीं ते आतां समाधानार्थ कांहीं बोलतील तेव्हां ते त्याजवळ कठोर भाषण करूं लागले. कारण त्यांस असें वाटलें कीं, ज्यापेक्षां योबाला एवढी मोठी विपत्ति प्राप्त झाली आहे, त्यापेक्षां हा चांगला मनुष्य नसावा. तो ढोंगी असावा, व त्याने कांहीं गुप्तरूपें दुष्ट कर्म केलें असावें, आणि त्याकरितां ईश्वर त्यास शासन करीत असावा. त्यांनी मग योबास सांगितलें कीं, जर तूं चांगला मनुष्य असतास, तर तुला ईश्वर साह्य करिता. नंतर त्यांनी त्यास आपल्या दुष्ट आचरणाविषयीं पश्चात्ताप करायास सांगितलें.

योबाने आपल्या मित्रांस असें उत्तर केलें कीं, "मी निरपराधी आहें." ज्या गोष्टीविषयीं ते बोलतात, त्याविषयीं आपण अपराधी नाहीं, हें त्यास ठाऊक होतें. तो ह्मणाला कीं कधीं कधीं चांगल्या मनुष्यावरहि मोठीं संकटें पडतात. त्या मित्रांनी आपल्यावर दया करावी ह्मणून त्याने विनंती केली; आणि ह्मणाला कीं, "तुह्मी करितां हें अगदीं योग्य नाहीं व न्यायाप्रमाणें नाहीं." आपल्या नावावरील दोष उडविण्याकरितां त्याने ईश्व-

रास प्रार्थना केली. तो असें ह्मणे कीं, "जरीं ईश्वराने मला मारिलें, तरीं मी त्यावर विश्वास ठेवीन. त्याला मी करितों तें ठाऊक आहे, त्याने माझी प्रचीत पाहिल्यानंतर मी सोन्यासारिखा निघेन." अणखी योब ह्मणाला,—

"हंहंहं जर माझीं वचनें लिहिलीं हंहंहं जर तीं पत्रावर कोरलीं,

जर तीं लोखंडाच्या खचरणीने आणि शिंगाने सर्वकालपर्यंत खडकांत खोदलीं तर बरें.

कां तर मी जाणतों कीं माझा उद्धरणारा जीवंत आहे आणि अंत्यकालीं भूमीवर उभा राहील.

आणि माझी त्वचा नष्ट झाल्यानंतर जरीं किड्यानीं हें शरीर नाशिलें, तरीं मी आपल्या देहाच्या ठायीं देवाला पाहीन.

त्याला मी आपणासाठीं स्वतां पाहीन आणि माझ्या स्थानीं दुसरा असें नाहीं; परंतु माझेच डोळे अवलोकन करितील जरीं माझ्या उदरीं माझीं आंतडीं नष्ट झालीं तरीं."

अद्यापिहि त्याचे मित्र त्यास दोष लावीत होते. आणि त्यांच्या मोठ्या वादविवादानंतर ईश्वराने मध्यस्थ पडून आपला अपार मोठेपणा व ज्ञान दाखिवलें. आणि योब हा ईश्वरापुढें किती लहान व अज्ञानी हें दाखविण्याकरितां त्याने योबास सृष्टि व मोठा सागर व प्राणी हे कसे निर्माण झाले व त्याचा संभाळ कसा झाला, याविषयीं पुष्कळ प्रश्न केले. योब फार नम्र झाला आणि आपण मोठा व पवित्र जो ईश्वर त्यापुढें फार अयोग्य व

नीच आहों हें त्यानें कबूल केलें. मग ईश्वरानें त्याचा पश्चात्ताप मान्य केला, व त्याची वर्त्तणूक पसंत केली. त्यानें योबाच्या तीन मित्रांस त्यांच्या अयोग्य वर्त्तणुकेविषयीं निषेधिलें आणि त्यांस आपापल्या पापाकरितां हवन करायास सांगितलें; व त्यांस क्षमा मिळण्याकरितां योबानें प्रार्थना करावी असें सांगितलें. मग ईश्वरानें योबाला यथास्थित केलें. आणि पहिल्यापेक्षां दुप्पट वस्तू दिल्या, आणि योबाचा अंतकाळ पहिल्या वेळेपेक्षां चांगला झाला. यानंतर योब हा १४० वर्षें वांचला.

---



## गोष्ट २३. मोशे.

मागील गोष्टींत सांगितलेले बारा भाऊ यांची संतती वाढत वाढत थोडक्या शतकानंतर इस्राएल लोकांची पुष्कळ जमात होऊन बारा जाती झाल्या. योसेफाच्या मरणानंतर पहिल्याप्रमाणें त्यांची चांगली अवस्था रा-

हिली नाहीं. जेव्हां याकोब मिसरदेशास गेला तेव्हां देवाने त्याला वचन दिल्हें होतें कीं "मी तुझ्या संततीचें मोठें राष्ट्र करीन;" आणि तसें करायास चुकला नाहीं. परंतु जेव्हां त्याची जमात पुष्कळ वाढली आणि अखत्यारवंत मनुष्य झाले तेव्हां मिसरदेशांतील राजे त्यांना भिऊं लागले. योसेफ मरून गेल्यानंतर मिसर देशांत एक नवा राजा झाला, त्याने इस्राएल लोकाना गुलामासारिखे वागविले. त्याने त्यांच्यापासून कठीण कामें करविलीं. तो सरकारी इमारत बांधित असतां त्याने त्यांस त्या इमारतीकरितां इटा पाडायास सांगितलें. राजाने शेवटीं असा एक कायदा केला कीं इब्री (ह्मणजे इस्राएल) लोकांची पुत्रसंतती अगदीं मारून टाकावी. फक्त त्यांच्या कन्या मात्र वांचू द्याव्या. त्याने आपल्या लोकांस असी आज्ञा केली कीं इब्री लोकांच्या बायका बाळंत होत्याच त्यांजपासून त्यांचे पुत्र हिसकून घेऊन नदींत टाकावे.

याप्रमाणें आज्ञा झाली असतां इस्राएलाच्या कोणेएके बायकोस एक सुंदर मुलगा झाला. तिने त्याला मोठ्या संकटाने तीन महिनेपर्यंत दडिवलें, आणि जेव्हां तिला दिसून आलें कीं यापुढें लपवूं शकणार नाहीं तेव्हां तिने तें लेंकरूं एके लव्हाच्या टोपलींत घालून नील या नदीच्या तिरीं लव्हाळ्यांत ठेविलें. त्यानंतर फारो राजा याची कन्या त्या नदीवर आंग धुवायाला आली. आणि तिने ती लाहान टोपली लव्हाळ्यांत पाहून आपल्या एके दासीस आणायास पाठविलें. आणि तिने त्या टोपलीचें वरचें झांकण काढून पाहिलें तों आंत

एक सुंदर लेंकरूं रडत आहे. तें लेंकरू पाहून तिला फार दया आली व तिने ह्मटलें "अरेरे, हें कोणी इब्री लोकाचें बाळक आहे." इतक्यांत त्या बाळकाची बहीण तेथें होती ती त्या राजकन्येला ह्मणाली, "अहो ताई साहेब, मी एक इब्री दाई त्या मुलाला पाजायाकरितां तुह्माला आणून देऊं काय?" हें ऐकून त्या राजकन्येने ह्मटलें, "होय, जा आण." मग त्या मुलीने धांवत जाऊन आपल्या आईला आणिलें. या प्रकारें त्या लाहान बाळकाचीच आई त्या राजकन्येस दाई मिळाली. आणि मग तिने तें लेंकरूं आपल्या वाड्यांत आणून त्याचें पाळण पोषण करून त्यास वाढविलें. आणि सर्व मिसर देशाच्या लोकांचें कळाकौशल्य त्यास शिकविलें. तिने त्याचें नाव मोशे, ह्मणजे (पाण्यांतून) काढलेला, असें ठेविलें.

अजूनपर्यंत इस्राएल लोकांवर पहिल्याप्रमाणेंच जुलूम चालला होता. मोशे मोठा झाला तेव्हां हा राजकन्येचा पुत्र आहे, असें सर्वांस वाटलें. असें असतांहि तो आपल्या जातीवर पराकाष्ठेचा जुलूम व विपत्ति पाहून फार खेद पावे. एका दिवसीं त्याने एक मिसर देशाचा मनुष्य एके इब्रीला मारतानां पाहून सहाय केलें आणि जो मारीत होता त्यास जिवें मारिलें. मोशे असें मानी कीं, आपल्या हातून देव भाऊबंदांस त्यांच्या दुःखापासून सुटका करवील हें त्या भाऊबंदांस माहीत पडेल; परंतु त्यांना याविषयीं कांहींच माहिती झाली नाहीं. जेव्हां या मारामारीची बातमी राजास समजली तेव्हां मोश्याला पळून जावें लागलें.

मग तो आरबी देशांतल्या रानांत आब्राहामाचे वंशज मिद्यान लोक राहत असत तेथें गेला. त्या ठिकाणीं रगुवेल मिद्यान लोकांत उपाध्या व अधिकारी होता त्याच्या सात मुली एके विहिरीवर पाण्याला गेल्या होत्या, त्यांना मेंढपाळानी मना केलें हे मोशे पाहून तेथें गेला आणि त्यांस शासन करून त्या मुलींनां त्यावेळेस साह्य केलें. यावरून त्याचा त्या मुलींचा बाप त्याशीं ओळख पडली. त्या उपाध्याने मोश्याला आपलीं जिप्पोरा नामक एक कन्या देऊन जावई केला आणि आपला मेंढ्यांचा कळप त्याच्या स्वाधीन दिल्हा. या प्रकारें राजकन्येचा दत्तक पुत्र परकी देशांत जाऊन जसा त्याचा बाप मेंढपाळ होता तसा झाला. तो आपल्या सासऱ्याचे मेंढे पाळून राहिला आणि मिसरदेशांतील राजवाड्याच्या शोभेची त्याने इच्छा धरिली नाहीं. नवीन करारांत मोश्याविषयीं जें लिहिलें आहे तें लक्ष्यांत आणल्यावर तो इतक्ये गरीब अवस्थेंत संतोष कसा पावला तें ध्यानांत येईल. असें लिहिलें कीं मोशे प्रौढ झाल्यावर त्याने फारोच्या कन्येचा पुत्र ह्मटला जाण्यास विश्वासेंकरून नाकारिलें. पापाचा उपभोग कांहीं वेळ घेण्यापेक्षां देवाच्या लोकांसंगतीं दुःख भोगणें, हें त्याला अधिक आवडलें. मिसरांतल्या द्रव्यापेक्षां ख्रीस्त-संबंधीं निंदा हें अधिक धन असें त्याने मोजिलें; कारण कीं त्याने फळावर दृष्टि ठेविली. मोशे आपल्या आईने शिकविल्याप्रमाणें आपल्या पातकाची क्षमा व आपलें तारण होण्याकरितां मोठा व गौरवयुक्त तारणारा जो यावयाचा होता त्यावर पूर्ण विश्वास ठेवी यांत संशय

नाहीं. त्याला देवाच्या वचनाचा मोठा भरंवसा होता कीं अब्राहामाच्या कुळांत तारणारा जन्मेल. अशा पूर्ण विश्वासाने तो वागे ह्मणून त्याला राजपुत्राचें गौरव व दौलत भोगण्यापेक्षां गरीब अवस्थेंत राहून लोकांपासून धिःकार व छळणा पावणें अधिक चांगलें वाटलें. देवाने आह्मावर कृपा करून आह्मालाहि मोश्याप्रमाणें वाटेसें करावें कीं कोणतीहि गोष्ट येशू ख्रीस्त आणि त्याचा तरुणोपाय यापुढें केवळ रद्द आहे.

———

## गोष्ट २४. फारोजवळ मोशे गेला याविषयीं.

जेव्हां मोशे मिसरदेशांतून पळून गेला तेव्हां त्याचें वय चाळीस वर्षांचें होतें. त्याने मिद्यान लोकांत चाळीस वर्षें मेंढपाळपणा केला; तथापि अजूनहि इस्राएल लोकांवरचा जुलुमाचा शेवट झाला नव्हता. एका दिवशीं होरेब या डोंगराजवळ रानांत मोशे आपल्या मेंढ्याचा कळप चारीत असतां त्याने एका झाडीस आग लागली असें पाहिलें, तथापि ती जळली नाहीं. तो तिजजवळ पाहायास गेला इतक्यांत त्याने आपणास हाक मारितो आहे असें ऐकिलें. ऐकतांच त्याने उत्तर केलें कीं "हा मी एथें आहें." मग दुसऱ्याने त्याला ऐकू आलें कीं, "एथें जवळ येऊं नको. तूं पायांतून जोडा काढ, कां कीं ज्या जमिनीवर तूं उभा आहेस, ती पवित्र आहे. आणि मी जो बोलतों आहें तो तुझ्या बापाचा, ह्मणजे आब्राहामाचा, इझाकाचा आणि याको-

वाचा देव आहे." मग मोश्याने आपल्या तोंडावर पदर घेतला. नंतर देव बोलला, "मी आपल्या लोकांची मिसरदेशांत किती विपत्ति होत आहे, ती खचीत पाहिली. आणि त्याना त्या विपत्तीच्या देशांतून काढून ज्या देशांत दूध मध पुष्कळ आहे त्या देशांत नेण्याकरितां मी खालीं आलों आहें. मी तुला फारोजवळ धाडतों आणि तूं इस्राएल लोकांस मिसर देशांतून काढून घेसील." हें ऐकून मोशे ह्मणाला, "मला मिसर देशांत फारोजवळ जाऊन इस्राएल लोकांस काढून आणण्याचा अख्त्यार कोठला ?" मग प्रभु ह्मणाला, "मी खचीत तुजबरोबर येईन." मोश्याने उत्तर केलें कीं, "माझें बोलणें त्यांना खरें वाटणार नाहीं. कारण ते मला ह्मणतील कीं, देव तुला भेटला, हें खरें कशावरून ?" नंतर प्रभूने मोश्याला विचारिलें कीं, तुझ्या हातांत तें काय आहे ?" तो ह्मणाला, "ती काठी आहे." मग प्रभु बोलला, "ती काठी भुईवर टाक." त्याने ती टाकली व लागलीच तिचा सर्प झाला. हें पाहून मोशे भिऊन पळाला. नंतर प्रभूने मोश्याला सांगितलें कीं, "त्या सर्पाचें शेपूट धर." मग मोश्याने आपला हात पुढें करून त्या सापाचें शेपूट धरिलें आणि पाहतो तों हातांत पहिल्याप्रमाणें काठी आहे. पुनः प्रभूने त्याला आज्ञा केली कीं, "तूं आपला हात छातीवर ठेव." मोश्याने तसें केलें. आणि मग छातीवरून काढून पाहतो तों त्याला तो हात कोडाने व्यापलेला बर्फासारिखा पांढरा दिसला. मग प्रभूने त्याला तोच हात पुनः छातीवर ठेव असें सांगितलें. तसें

त्याने केल्यावर तो हात पहिल्याने होता त्याप्रमाणें झाला. आणि प्रभु बोलला, "या दोन खुणा जाणून जर त्या लोकानी तुझ्या वचनास मान न दिल्हा तर तूं नदीचें पाणी घेऊन सुखे जमिनीवर ओत. मग त्या पाण्याचें रक्त होईल." मोशे ह्मणाला, "प्रभू, मी बोलण्यांत पट्टाइत नाहीं. मी अडखळत व खोळंबत बोलतों." यावर प्रभूने विचारिलें कीं, "मनुष्याचें तोंड कोणी केलें? अथवा मुके, बहिरे, आंधळे डोळस मजवांचून दुसरा कोण करितो? तर तूं आतां फारो राजाकडे जा आणि तूं काय बोलावेंस ते मी तुला शिकवीन. अणखी देवाने त्याला विचारिलें, "आहरोन जो लेवी तो तुझा भाऊ नव्हे काय? पाहा तो तुला भेटायास येत आहे. त्याला जें तुला बोलायाचें असेल तें सांग; मग तो लोकानां तुजसाठीं सांगेल." त्याप्रमाणें झालें. मोशे व आहरोन मिसरदेशांत जाऊन, मुख्य वयांतील इस्राएल मनुष्य एकत्र जमवून त्यांस ह्मणाले कीं, "देव तुह्माला मिसरदेशांतून काढून न्यायास इच्छित आहे." त्यावर ते राजाजवळ गेले आणि ह्मणाले, "आमच्या देवाने आह्मास असी आज्ञा केली आहे कीं आह्मा सर्वांहीं रानांत जाऊन तेथें त्याच्या नावाने समाराधना घालावी." यावर फारोराजाने उत्तर केलें कीं, "असा तो कोण प्रभु आहे कीं मी त्याची आज्ञा मान्य करावी? मी तुमच्या देवाला ओळखत नाहीं आणि तुह्माला एथून जाऊं देणार नाहीं."

त्या दिवसापासून फारोराजाने आपल्या लोकांस असी आज्ञा केली कीं त्या इस्राएल लोकानां पहिल्यापेक्षां

अधिक त्रास द्यावा. "ते लोक फार चढून गेले आहेत; यास्तव तुह्मी पूर्वींप्रमाणें त्यानां विटा करण्याकरितां पेंढा देऊं नका; त्यानीं जाऊन आपल्यासाठीं पेंढा मिळवावा." मोश्याने खरोखर फारोराजासमोर आपल्या काठीनें चमत्कार करून दाखविले; परंतु मिसरदेशांतील जादुगार त्यासारिखे कांहीं चत्कार करून दाखवीत, ह्मणून राजाने मोश्याचें ऐकिलें नाहीं. नंतर भय दाखवणाऱ्या आश्र्चर्यकारक गोष्टी मोश्यापासून देवाने करविल्या, त्या राज्यांत लागोपाठ नानाप्रकारचे रोग पाठविले. आहरोनाने आपली काठी नीलनदीवर ठेवतांच त्या नदीचें पाणी बदलून रक्ताप्रमाणें झालें. सात दिवसपर्यंत नदी रक्ताप्रमाणें वाहिली व तिचें पाणी प्यायाचे कामास पडत नाहीं असें झालें, आणि आंतील मत्स्य मरून गेले. हा पहिला रोग झाला. इतकें जरीं देवाने करविलें तरीं फारो राजाने इस्राएल लोकांस जाण्याची मोकळीक दिल्ही नाहीं.

आहरोनाने मिसरदेशांतील पाण्यावर हात ठेविला आणि तेणेंकरून सर्व देशभर असंख्य बेडूक उत्पन्न झाले. ते लोकांच्या घरांत शिरून, निजायाच्या खोलींत जाऊन, त्यांतून कित्येक पलंगावरहि बसले; कित्येक चुलींत शिरले, व कित्येक काठवटींमध्यें शिरले. हें पाहून फारोने मोश्याला आणि आहरोनाला बोलावून आणून सांगितलें कीं, "हे बेडूक नाहींसे व्हावे ह्मणून तुह्मी देवाची प्रार्थना करा. ह्मणजे मी त्या लोकांस सोडीन." यावरून मोश्याने देवाची प्रार्थना केल्यानंतर ते सर्व बेडूक एका दिवसांत मेले. मग लोकानी त्यांस

खंड्यांच्या खंड्या गोळा केलें, तेव्हां त्यांची घाण सर्व देशभर सुटली. हे बेडूक मेल्यानंतर फारो राजाने बोलल्याप्रमाणें त्या लोकांची सुटका केली नाहीं; हें पाहून देवाला दुसरें अरिष्ट पाठविणें प्राप्त झालें.

मग आहरोनाने आपली काठी जमीनीवर मारिली तेव्हां सर्व देशांतील माती उवांनी भरली आणि त्या उवा माणसांला व जनावरांलाहि फार त्रास देऊं लागल्या. जादूगीरानी फारो राजास सांगितलें कीं हें देवाचें कृत्य आहे. तरीहि त्याच्या मनांत कांहींच वाटलें नाहीं. उवांच्या अरिष्टानंतर दुसरे दुसरे दुःखदायक प्राणी उत्पन्न झाले आणि गुरांवर मरी आली. तेणेकरून पुष्कळ बैल, मेंढें, गाढवें, घोडे, मेले. तरीहि फारोराजाच्या निष्ठुर मनाला द्रव आला नाहीं.

यानंतर मोश्याने आपल्या दोन्ही मुठी भरून राखाडी घेतली आणि हवेंत उडविली. असें करतांक्षणींच सर्व मणासांच्या आणि पशूंच्या आंगावर पुळ्या उठल्या प्रत्येक वेळीं मोशे अरिष्टाला केव्हां प्रारंभ होईल व केव्हां शेवट होईल हें सांगत असे. तरीहि फारोराजाचें अंतःकरण अरिष्ट होऊन गेल्यावर, पूर्ववत कठीण झालें.

यानंतर मोश्याने आपली काठी आकाशाकडे धरिली तेव्हां अकस्मात त्या देशांत कधींहि झालें नव्हतें असें वादळ झालें. आणि घडघडून गारांचा पाऊस पडला झाडें मोडून पडलीं, व गारांच्या सडाकाने शेतांत मनुष्यें व गुरें जीं कामाला लागलीं होतीं, तीं ठार झालीं. मग फारोराजाने मोश्यास व आहरोनास बोलावून आणि-

लें आणि ह्मटलें कीं, "माझ्यापासून यावेळेस पाप झालें. तुह्मी देवाची प्रार्थना करून हा घडघडाट व गारांचा पाऊस यापुढें पडणार नाहीं असें करा." मग मोशे शहराच्या बाहेर गेला आणि हात पसरून देवाची प्रार्थना केल्यावर घडघडाट व गारांचा पाऊस बंद झाला.

मग फारोराजाची वासना पहिल्याप्रमाणेंच पुनः दुष्ट झाली. नंतर पूर्वेकडील वारा सुटून टोळ आले आणि गारांच्या पाऊसापासून जें बचावून बाकी राहिलें होतें तें त्यांनी खाऊन टाकिलें. हें पाहून फारोने पुनः मोश्याची व आहरोनाची प्रार्थना केली कीं, "एवढे वेळेस माझ्या पापाची क्षमा करा." तेव्हां प्रभूने पश्चिमेकडून बळकट वारा पाठविला तेणेंकरून सर्व टोळ आरबी आखातांत जाऊन पडले. हें अरिष्ट जाताक्षणींच फारोचें मन पुनः जसें कठोर होतें तसें झालें.

यानंतर मोश्याने आकाशाकडे हात लांब केला तेव्हां त्या देशांत जिकडे तिकडे फार काळोख पडला. तेणेंकरून मनुष्यें जागचे जागींच बसलीं, व कोणी कोणाला दिसत नाहीं असें झालें. परंतु गोशेन प्रांत जेथें इस्राएल राहत होते तेथें मात्र उजेड होता.

एवढीं अरिष्टें येऊन पडलीं तरीं फारोराजाचें अंतःकरण पालटलें नाहीं. तो मोश्यास बोलला कीं, तुझा जीव तुला प्रिय असला तर मजपासून निघून जा. मला पुनः तोंड दाखवूं नको. जर दाखविलेंस तर प्राणास मुकला जासील.

---

## गोष्ट २५. इस्राएल लोकांची सुटका.

फारोच्या उन्मत्तपणाची पराकाष्ठाच झाली असें पाहून प्रभूने मोश्यास सांगितलें कीं, “अजून एक अरिष्ट फारोराजावर आणि त्याच्या देशावर माझ्या मनांत पाठवायाचें आहे. तें पाहून तो राजा तुह्माला आपल्या देशांतून जाण्यास मोकळीक देईल इतकेंच नाहीं, तर तुह्माला हांकलून लावील. यास्तव मी एक दूत पाठवितों, तो त्या त्याच्या ज्येष्ठ पुत्रांला मारून टाकील.” इस्राएल लोकांना देवाने जाण्याची तयारी करायास आज्ञा दिल्ही, आणि सांगितलें कीं, “तुह्मी एकएक्या घरासाठीं एक कोंकरूं ज्याला खोड नाहीं तसें घ्यावें तुह्मी त्याला माराल मग त्याचें रक्त आपापल्या घराच्या दोहों बाजूंवर व दरवाजावरच्या खांडावर शिंपावें. ह्मणजे मी जो मूल मारायाकरितां दूत पाठविणार आहें, तो जेथें तें रक्त पाहील त्याघरचें मूल मारणार नाहीं. तें कोंकरूं भाजल्यानंतर तुह्मी आपल्या कंबरा बांधून पायांत जोडे घालून आणि हातांत काठ्या घेऊन जलदीने खा. तो दिवस प्रभूचे उत्साहाचा असें माना, व मी जें अरिष्ट पाठविणार आहें, त्यापासून तुह्माला पिडा होणार नाहीं.”

नेमलेला वेळ जवळ आला असतां इस्राएल लोकांनी निघण्याची तयारी केली. देवाने मध्यरात्रीं गरीब गुरीब चाकराच्या कुटुंबापासून फारोराजाच्या कुटुंबापर्यंत सर्व ज्येष्ठ पुत्रांचा व पशूचे प्रथम वत्स यांचाहि जीव घेतला. मग त्या देशाच्या प्रजेने अतिशय दुःखाने

शोक केला; आणि राजाला व राजमंडळीला मोठें भय प्राप्त झालें. तेव्हां त्यानी इस्राएल लोकांना लागलेंच देशाबाहेर हाकून लाविलें. कारण ते ह्मणाले कीं, "तुह्मी एथें राहिलां तर आह्मी सर्व मारिलें जाऊं." या प्रकारें इस्राएललोक मिसर लोकानी दिलेलीं वस्त्रें, उंच किमतीचीं भांडीं, सोनें, रुपें घेऊन गुलामपणांतून सुटून त्या देशाबाहेर गेले. त्यानीं आपल्याबरोबर भाकरीक-रितां बिनफुगलेली कणीक घेतली. कां कीं त्यानां भाकरी भाजायापुरता वेळ नव्हता.

जेव्हां फारोराजाने आणि त्याच्या रयत लोकानीं पहाटेस उठून पाहिलें कीं सर्वांच्या घरीं एकएक मुडदा पडलेला आहे तेव्हां ते किती दुःखाने ओरडले असतील व मनांत भ्याले असतील; आणि गरीब बिचारे इस्राएल लोक आपण आपल्या घराच्या खांबावर रक्ता-ची खूण करून ठेविली होती ह्मणून आपल्या एथचें कोणी मेलें नाहीं असें पाहून किती हर्ष पावले असतील? आणि दुसरें तुह्मी खचीत जाणा कीं ख्रीस्त जो शास्त्रांत देवाचा कोंकरा असा ह्मटलेला आहे, आणि जो आपणा-करितां बळी गेला त्याविषयीं खूण होती. ज्या दिवसीं ई-श्वर मनुष्याची झाडाझडती घेऊन अपश्चत्तापी व अवि-श्वासी लोकांस भयंकर शिक्षा लावील, तेव्हां येशू ख्रीस्ता-च्या मरणाकडून जें प्रायश्चित्त झालें याजवर ज्यांचा भरवसा आहे ते सर्व वचावले जातील.

इस्राएली मिसर देशांतून निघून रानांत एका दिवसाच्या वाटेवर गेले ही गोष्ट फारोराजाने ऐकतांक्षणींच त्याला त्यांस जाऊं देण्याविषयीं पश्चात्ताप झाला. त्याने आपली

फौज लौकर तयारी केली आणि त्यांच्या पाठीस लागला. ते लोक आरबी आखाताजवळ डोंगरी मार्गावर जाऊन पोहंचत आहेत इतक्यांत त्याने त्यांस आटोपिलें. इस्राएललोक मिसर देशाची फौज आपल्यावर चालून लगत आली असें पाहून भयाने कांपूं लागले; परंतु मोश्याने त्यांस धीर दिल्हा. तो ह्मणाला कीं, "भिऊं नका, स्वस्थ असा. ईश्वर तुमच्या करितां लढाई खेळेल." त्या वेळेस ते लोक किती कठीण व भयाच्या जागेंत सांपडले होते, हें पुढें लिहितों यावरून सहज कळून येईल. पाहा कीं, त्यांपुढें खोल समुद्र होता. दोहीं बाजूला चढायास अवघड असे कडे होते. आणि पाठीमागें मिसर देशाची फौज होती. नंतर प्रभु मोश्याला ह्मणाला "तूं मला कशाला हाक मारितोस? इस्राएली लोकांस सांग कीं, तुह्मी पुढें चाला." पुढें कोठे जावें? आरबी आखातांत कीं काय? होय. प्रभु बोलला कीं "आतां मिसर देशाच्या लोकांना दिसून येईल कीं, त्यांची एवढी मोठी फौज, इतके पुष्कळ रथ, इतका मोठा राजा असतांहि, मी त्यांसीं जय मिळविला."

तेव्हां मोश्याने आपला हात समुद्रावर लांब केला, मग परमेश्वराने प्रचंड वारा सोडून समुद्राला रात्रभर सारून सारून समुद्र कोरडा केला आणि पाणी दुबागलें. अणखी ईश्वराने दोहीं फौजेच्यामध्यें मोठ्या खांबांच्या आकृतीचें आकाशांत एक ढग निर्माण केलें. तें इस्राएली लोक ज्या बाजूला होते त्या बाजूस चकचकीत होतें, तेणेंकरून त्यांच्या तंबूंत उजेड पडला; परंतु दुसऱ्या त्यांचे शत्रू जे बाजूस होते त्यांच्यावर काळोख

पडून त्यानां ते दिसत नाहींसे झाले. याप्रकारें रात्रींच्या वेळीं इस्राएल लोक समुद्रामधून कोरड्या भूमीवरून चालले; आणि त्यांच्या उजव्याकडे व डाव्याकडे पाणी त्यांस भिंत असें झालें.

असेंहि असतां फारोने त्यांची पाठ सोडिली नाहीं. आणि मोठ्या सकाळीं त्याचें सैन्य समुद्रामध्यें शिरलें; परंतु तें तेथें येऊन पोहंचलें नाहीं इतक्यांत इस्राएल लोक पैल तिरास गेले. यानंतर प्रभूने मोश्यास सांगितलें कीं, “तूं आपला हात समुद्रावर लांब कर.” मग तसें मोश्याने केल्यानंतर शत्रूच्या सैन्यावर पाणी परत आलें. मग ते लोक तेथून पळूं लागले; परंतु त्यांचा सर्व यत्न व्यर्थ जाऊन समुद्राच्या लाटांनी ते अगदीं बुडून गेले. त्यांतून एकहि वांचला नाहीं.



## गोष्ट २६. इस्राएल अरण्यांत.

मिसर देशापासून खनान देशांत जायास रानांतून

रस्ता होता. मिसर देशाप्रमाणें धान्याचें शेत व फळदायक ओहोळ नव्हता. सर्व दिवस मज्जल चालली असतांहि रेतीवांचून दुसरें कांहीं वाटेंत लागत नसे. विहिरी अथवा चार अथवा मनुष्याचें पाऊल लागलेलें अथवा मनुष्याची वस्तीहि नव्हती. रात्या समुद्रापासून तीन दिवसांच्या मजलांवर इस्राएली लोकांना एक तळें लागलें; परंतु त्यांतील पाणी कडूं होतें ह्मणून त्यांच्याने तें पिववलें नाहीं. मग ते लोक मोश्याजवळ कुरकूर करूं लागले. मग प्रभूने त्याला एक झाड दाखविलें, आणि त्यानें तें झाड पाण्यांत टाकतांच तें पाणी गोड झालें. ईश्वर त्या लोकांस असें ह्मणाला कीं, "तुला बरें करणारा मी प्रभु आहें."

नंतर ते लोक भाकरी व दुसऱ्या अन्नाकरितां मोश्याजवळ कुरकूर करूं लागले. नंतर ईश्वराने लावा जातीचे पक्षी पुष्कळ येईसे केले आणि दुसऱ्या दिवसीं सकाळीं लहान व वाटोळा कांहींसा पदार्थ शुभ्र दवाप्रमाणें जमीनीवर पडला. त्याचें नाव काय ह्मणाल तर त्याला इस्राएल लोक आपल्या भाषेत मान्ना असें ह्मणत कारण कीं तो पदार्थ काय होता, हें त्यास ठाउक नव्हतें. मग मोशे त्या लोकांस ह्मणाला कीं, "प्रभूने जी तुह्मास भाकरी पाठविली, ती हीं." ते वाटोळे लहान दाणे मधीप्रमाणें गोड आणि सुंदर पिठाप्रमाणें जिव्हेस रुचि देणारे व शरिरास पुष्ट करणारे, असे होते.

नंतर त्या लोकानां पाण्याविषयीं अडचण पडली आणि मग पुनः ते कुरकुरूं लागले. मोश्याने त्याविषयीं ईश्वराकडेस गाऱ्हाणें केलें. मग ईश्वराने त्यास सांगि-

तलें कीं, "आपली काठी घेऊन ती कातळावर मार." मग मोश्याने तसें करतांच त्या कातळांतून पाणी येऊं लागलें. ईश्वर कातळांतून स्वच्छ पाणी निघेसें करीत असतांहि, या मोलवान कृत्याविषयीं लोक किती थोडका विचार करितात!

थोडक्या दिवसानंतर आमलेकी लुटारू जातीचे लोक येऊन इस्राएलाबरोबर लढाया करूं लागले. मोश्याने त्यांजबरोबर लढायास यहोशवा यास पाठविलें; आणि आपण डोंगराच्या शिखरावर जाऊन हात पसरून ईश्वराची प्रार्थना करूं लागला. जोंपर्यंत मोशे आपले हात वर करून होता, तोंपर्यंत इस्राएल यांचा जय झाला आणि जेव्हां त्याने हात खालीं केले तेव्हां आमलेकी यांचा जय झाला. नंतर आहरोन व हर, यानी त्याच्या हातांस आधार दिल्हा. असें होतांच इस्राएल लोकानी आमलेक लोकांचा पराभव केला.

परंतु सर्वोत्कृष्ट गोष्टीचा भाग सांगायाचा राहिला. ओसाड अरण्यांत मोश्यास रस्ता कसा सांपडला?" ढग व अग्नी, जिणे त्यांस तांबड्यासमुद्रांतून वाट दाखविली होती, ती तशीच आजपावेतों त्याच्या पुढें चालत होती. त्या लोकांस ईश्वराने दिवसास ढग व रात्रीस अग्निस्तंभ दाखवून सर्व रस्त्यांतून आणिलें.

---

## गोष्ट २७. नियम देण्याविषयीं.

मिसरदेश सोडल्यानंतर तिसऱ्या महिन्यांत इस्राएल लोक सीनापर्वताच्या अरण्यांत आले. या पर्वताजवळ-

च्या खिंडींत आपल्या कळपासहवर्तमान ते लोक एक-वर्षभर राहिले. त्या वर्षांत भारीगोष्टी घडल्या, त्या यांप्रमाणें: जाती व कुटुंबें यांविषयीं नियम झाले; लोकांची संख्या गणिली; आणि त्यावर सरदार, अधिकारी व न्यायाधीश नेमले. इस्राएलाचे पुरुष सहा लक्ष होते. आणि बायका मुलें मिळून सुमारें तीस लक्ष मनुष्यें होतीं. ईश्वराने त्यांस घर प्रकरणें व्यवहार व राजकीय कामें चालविण्याविषयीं नियम लावून दिल्हा. अणखी यावेळीं ते इस्राएल लोक विशेष रितीने व करार केल्याने ईश्वराचे लोक झाले.

त्यानी तेथें तळ दिल्ह्यावर लागलाच मोशे सीना पर्वतावर गेला. आणि प्रभूने त्याला सांगितलें कीं, "तिसऱ्या दिवसाकरितां मनुष्यांस तयार कर. कारण तिसऱ्या दिवसीं प्रभू खालीं येऊन सीना पर्वतावर सर्व लोकांच्या दृष्टीस पडणार आहे. आणि तूं त्या लोकांच्या सभोंवतीं हद्द करून ठेव. कारण कीं जो कोणी त्या पर्वतास स्पर्श करील तो मरेल."

जेव्हां तिसरा दिवस उजेडला, तेव्हां त्या डोंगरासभोंवताले दाट ढग आले होते घडघडाट चालला होता व विजा लवू लागल्या, आणि करण्याचा आवाज फार मोठा होऊं लागला. सर्व सीना डोंगर धुराने भरून गेला आणि करण्याचा आवाज अधिक अधिक मोठ्याने होऊं लागला. मोशे डोंगरावर ईश्वरासमोर उभा राहिला आणि सर्व लोक खालीं स्वच्छ वस्त्रें नेसून उभे होते व ते सर्व भयाभीत व कंपायमान झाले होते. आणि ईश्वर जे शब्द बोलला ते येणेप्रमाणें.—

"ज्याने तुला मिसर देशांतून व दास्यपणांतून बाहेर आणिलें तो मी परमेश्वर तुझा देव आहें. माझ्याशिवाय तुला दुसरे देव नसोत. तूं आपल्याला कोरींव मूर्त्ति करूं नको, आणि जें वरतीं आकाशांत अथवा जें खालतीं पृथ्वींत अथवा जें पृथ्वीखालीं पाण्यांत त्याची प्रतिमा करूं नको; त्याच्या पायां पडूं नको आणि त्याची सेवा करूं नको. कारण कीं मी आवेशी देव आहें; व जे माझा द्वेष करितात, त्यांच्या तिसऱ्या आणि चवथ्या पिढीपर्यंत बापाच्या अन्यायामुळें लेंकरांचें शासन करितों. आणि जे मजवर प्रीति करितात व माझ्या आज्ञा पाळितात, त्या हजारो जणांवर मी दया करितों. परमेश्वर तुझा देव याचें नाव तूं उगेंच घेऊं नको. कारण कीं जो प्रभूचें नाव उगीच घेतो, त्याला परमेश्वर निर्दोषी असें मानणार नाहीं. शाब्बाथ दिवस पवित्र राखायाचें स्मरण ठेव. साहा दिवस खपून आपलें सर्व काम कर; परंतु सातवा परमेश्वर जो तुझा देव याच्या विसाव्याचा दिवस आहे, त्या दिवसीं तूं कांहीं काम करूं नको. तूं अथवा तुझा मूल अथवा तुझी मुलगी अथवा तुझा चाकर अथवा तुझी दासी अथवा तुझें ढोर अथवा तुझ्या दरवाज्यांतील परकें मनुष्य या सर्वांस त्या दिवसीं काम करूं देऊं नको; कारण कीं साहा दिवसांत प्रभूने आकाश, पृथ्वी, समुद्र व त्यांतील जें सर्व, तें केलें. आणि सातव्या दिवसीं विसावा घेतला. याजकरितां ईश्वराने त्या शाब्बाथ दिवसास आशीर्वाद देऊन पवित्र केला.

तूं आपल्या बापाचा व आईचा मान राख, कीं जेणेंकरून तुला ईश्वराने जें आयुष्य दिल्हें आहे, तें वाढावें.

तूं हत्या करूं नको. तूं व्यभिचार करूं नको. तूं चोरी करूं नको. तूं आपल्या शेजाऱ्याविषयीं खोटी साक्ष देऊं नको. तूं आपल्या शेजाऱ्याच्या घरावर लोभ ठेवूं नको; त्याच्या बायकोवर अथवा त्याच्या चाकरावर अथवा त्याच्या दासीवर अथवा त्याच्या बैलावर अथवा त्याच्या गाढवावर अथवा जें कोणतेंहि त्याचें असेल, त्यावर लोभ ठेवूं नको."

नंतर त्या सर्व लोकानी विजा लवतांना व डोंगरांतून धूर येतांना पाहिलें. आणि त्यानी आकाशगर्जना व करण्याचा आवाज ऐकिला. असें पाहिल्यानंतर ते एकीकडेस सरले आणि दूर जाऊन उभे राहिले; आणि मोश्यास ह्मणूं लागले कीं "तूं आह्मासीं बोल मग आह्मी ऐकूं. परंतु देवाने आह्मासीं न बोलावें; बोलला तर आह्मी मरूं. नंतर प्रभु मोश्यास ह्मणाला, "माझें भय धरावें आणि माझ्या सर्व आज्ञा पाळाव्या असें जर हृदय त्यांच्याठायीं असलें तर बरें.

नंतर मोशे डोंगरावर ढगांत गेला आणि तेथें चाळीस दिवस व चाळीस रात्री राहिला. आणि प्रभूचें बोलणें झाल्यावर प्रभूने त्याला आपल्या हाताने दोन दगडावर करार कोरून ते दगड दिल्हे.

ते मोशे घेऊन खालीं आला; परंतु तो खालीं आला तेव्हां पाहा, काय तेथें लोक करीत होते, तें! त्यानी वासराची मूर्त्ति करून तीसभोवते नाचत व गात होते, व वाद्यांचा गजरहि करीत होते. हें पाहून मोश्यास फार राग आला आणि त्याने आपल्या हातांतून ते दगड टाकून फोडले. मग मोशे आहरोनास ह्मणूं

लागला, "तुजजवळ लोकानी हें काय केलें? तूं त्या सर्वावर अतिशय पाप आणिलेंस." आहरोन ह्मणाला, "महाराज, तापूं नका. लोक किती दुष्ट आहेत, हें तुह्मास ठाऊक आहे. कारण ते मला ह्मणूं लागले कीं, आमच्यापुढें जाणारे असे देव करून दे, अणखीहि ते ह्मणाले, ज्या मोशे मनुष्याने आह्मास मिसरदेशाबाहेर आणिलें, त्यास काय झालें, हें आह्मास नकळें. मग मी त्यांस ह्मणालों, ज्या कोणाजवळ कांहीं सोनें असेल त्यानी तें काढून मजपासीं द्यावें. नंतर माझ्या स्वाधीन त्यानी सोनें केलें. मग मी तें विस्तवांत टाकिलें आणि त्याचा हा नंदी झाला."

नंतर मोश्याने जो त्यानी नंदी केला होता, तो घेऊन विस्तवांत जाळून आणि त्याचें चूर्ण करून तें चूर्ण पाण्यांत टाकिलें आणि तें पाणी सर्व इस्राएल लोकांजवळून पिवविलें. मोशे ईश्वरास सांगूं लागला कीं, "ह्या लोकानी फार पाप केलें, व त्यानी आपल्यानां सुवर्णाचे देव करून घेतले. तरी आतां तूं त्यांस क्षमा कर, नाहींतर माझें नांव तूं आपल्या स्मरणवहींतून काढून टाक." मग प्रभू मोश्यास ह्मणाला कीं, "ज्याने पाप केलें आहे त्याचें नाव मी काढून टाकीन. तर आतां जा आणि मी जें स्थळ तुला सांगितलें आहे, तेथें या लोकाना ने. माझा दूत तुजपुढें चालेल. आणि मी झडती घेईन तेव्हां त्याना शासन करीन." अणखी प्रभूने त्यांस सांगितलें कीं, पहिल्याप्रमाणें दोन दगडाच्या पाट्या काप आणि त्वां पहिल्या ज्या दोन पाट्या फोडल्या, त्यांवर जे शब्द होते, ते मी लिहीन. तर स-

काळीं तयार होऊन सीना डोंगरावर ये आणि मजपुढें उभा राहा.

नंतर मोशे पुनः चाळीस दिवस आणि चाळीस रात्री त्या डोंगरावर प्रभुजवळ होता. एवढ्या वेळेस त्याने कांहीं खाल्लें नाहीं, व प्याला नाहीं. आणि प्रभूने त्या दोन पाट्यांवर कराराचे शब्द ह्मणजे दाहा आज्ञा लिहिल्या.

---

## गोष्ट २८. जनव्यवहारसंबंधी नियम.

जेव्हां देवाने इस्राएल लोकांस फारोच्या हातांतून मुक्त केलें, आणि त्यांच्या बंदाचा जो मिसर देश त्यांतून त्यांस बाहेर आणिलें, तेव्हां तो कृपाळू होऊन त्यांचा राजा झाला, आणि त्यांच्या स्थितीस योग्य असे त्यांस त्याने नियम दिल्हे. संसार इत्यादिकांतील गोष्टी कोणत्या प्रकारें चालवाव्या याविषयीं ते नियम होते. ह्या नियमांत मनुष्यांचे प्राण अवयव व मालमत्ता यांचा संभाळ करण्यासाठीं उपाय सांगितले होते. नवरे आणि त्यांच्या बायका, मुलें आणि त्यांचीं आईबापें, धनी आणि त्यांचे सेवक, या परस्परांच्या कर्त्तव्य कर्माविषयीं ते नियम होते. तसेंच इस्राएल लोकांचें अन्नवस्त्र घरें जमिनी, त्यानी जनावरांसीं कोणत्या प्रकारें वर्तणूक करावी, त्याविषयीं होते.

या नियमांचें सविस्तर वर्णन एथें या लहानशा पुस्तकांत करायास जागा नाहीं; परंतु त्या सर्वांविषयीं धार्मिक जे यहूदी लोक ते सत्यतेने असें ह्मणत कीं, "ईश्वराचे आदेश यथार्थ आहेत. ते हृदय संतुष्ट करि-

तात. ईश्वराच्या आज्ञा पवित्र आणि प्रकाशकारक आहेत." ईश्वर मोश्याकडून त्या लोकांला असें ह्मणाला कीं, "जो सर्व धर्मविधि मी तुह्मापुढें ठेवितों त्यासारिखे नियम आणि विधि जिच्याजवळ आहेत असी महाजाति कोणती आहे? ईश्वराचे न्याय सत्य आहेत; ते सर्वतः सात्विक आहेत."



## गोष्ट २९. क्रियाकर्मसंबंधी विधि.

मनुष्यें भ्रष्ट झाल्यापासून देवाचे लोक आपलीं पापें कबूल करण्यास आणि येणार तारणाराच्या मध्यस्थीने ईश्वराच्या दयेवर आपली आशा आहे असें दाखविण्यास बळीअर्पण करीत असत. हें ईश्वराने स्थापून दिल्ह्याप्रमाणें ते करीत. परंतु बळि अर्पण करण्याचे नेमलेले काळ अथवा जागा होत्या असें शास्त्रावरून आपणास दिसत नाहीं. जेथें जेथें ते राहत अथवा जिकडे जिकडे फिरत तिकडे ते ईश्वराकरितां यज्ञवेदी बांधीत आ-

णि बळी अर्पण करीत आणि त्यांचें आज्ञापालन व वि-श्वास पाहून ईश्वर प्रसन्न झाला.

कुटुंबाचा जो वडील तो आपणाकरितां व आपल्या कुटुंबाकरितां बळी अर्पण करीत असे. आणि कुटुंबां-तील माणसांसहि अर्पण करण्याची बंदी नव्हती. जसें आदाम जीवंत असतानां आबेलाने ईश्वरास अर्पण केलें तसें.

परंतु या वेळीं देवाचे लोक अन्य लोकांपासून निरा-ळेच होणार व नव्या राज्याखालीं राहणार ह्मणून बळी व दुसरीं अर्पणें कसीं करावीं याविषयीं विधि करण्याचें ईश्वरास योग्य दिसलें. लेवी वंश, ज्यांत मोश्याचा जन्म झाला, तो दुसऱ्या वंशापासून निराळा केला, व त्यास वि-शेष अधिकार दिले. मोश्याच्या संततीस दुसऱ्यावर अ-धिकार मिळाला नाहीं खरा; परंतु त्याचा भाऊ आह-रोन आणि त्याचे वंशज यांस याज्ञिकी मिळाली. आ-णि लेवी याच्या वंशांतून शिक्षक व वैद्य आणि लोकांचे अधिकारी व सरदार हे निवडले गेले.

आहरोन यास मोठ्या समारंभाने मुख्य उपाध्येपणा-चा अभिषेक केला, आणि याज्ञिकीचीं वस्त्रें दिल्हीं, आणि ईश्वराच्या भजनाकरितां एक मोठी सुंदर राहुटी बांधिली असें झालें. त्या राहुटीच्या अगदी आंतल्या खोलींत जें अतिपवित्र स्थान, तेथें सोनेंयुक्त पेटींत, देवाने स्वतां ज्यावर नेम लिहिले होते, त्या पाट्या ठेविल्या होत्या. आणि राहुटीच्या दुसऱ्या भागांत मुख्य उपाध्या नित्य प्रार्थना करून धूप जाळीत असे. त्या राहुटीभोंवता-लचें एक मोठें अंगण होतें, त्यांत यज्ञस्थंडिल बांधिलें

होतें. आणि तेथेंच मात्र अर्पणें करावीं असें होतें. आपलीं पापें कबूल करण्याकरितां व पश्चात्तापाच्या खुणे-करितां नाना तऱ्हेचीं अर्पणें नेमलीं होतीं.

वर्षांतून तीनदा मोठा सण होता. त्याकरितां सर्व पुरुषांस यावें लागत असें. यांतील एक सण वल्हांडण सण होता. इस्राएल लोकांची मिसरदेशांतून सुटका, त्याच्या स्मरणार्थ ते हा सण पाळीत. तसेंच सिना पर्व-तावर देवानें आज्ञा दिल्या होत्या, त्यांच्या स्मरणार्थ सप्त-कांचा सण स्थापिला होता. आणि राहुट्यांचा सण होता. या तीन सणांचा, जमिनीच्या लागवडीकडेहि संबंध होता. खनानदेशांत पोहंचल्यानंतर वल्हांडण सणांत जव धान्याची पिकलेली पहिली जुडी स्थंडिला-वर ठेवावी असें होतें. कारण त्या सणाची वेळ जवाच्या पिकाच्या प्रारंभींच होती. त्या सणांतहि पुढें येणारा जो तारणारा, त्याच्या रक्तानें मात्र तारण होईल असें दाखवीत. सप्तकांच्या सणास सुगीचा सण असें ह्मणत; कारण तेव्हां जवांचें पीक होऊन नंतर गव्हांच्या पि-कास प्रारंभ होत असे. राहुट्यांचा सण द्राक्षाच्या पि-कानंतर ईश्वराचा आभार मानण्याकरितां स्थापिला होता. सणाच्या समारंभीं नेहेमी लोक आपलीं कामें बंद करीत नसत; केवळ सणाच्या पहिल्या व शेवटच्या दिवशीं शाब्बाथ असत ह्मणून कामें बंद होत. यहुदी लोक अद्याप यांतून कांहीं सण पाळितात.

या कर्ममार्गसंबंधी विधीचें कारण व हेतु उघड आहे. इतर लोकांपासून इस्राएल लोक वेगळे करावे, आणि त्यांस पवित्रलोक व देवाची पृथ्वीवरील निवडलेली

मंडळी असी राखण्यास हे नियम लावून दिल्हे होते. अणखी दुसरें कारण असें होतें कीं, पुढें जो गौरवयुक्त ईश्वरी तारणारा येणार होता त्याचे गुणवर्णन व काम व त्याच्या शुभवर्त्तमानापासून जें वैभवयुक्त कल्याण प्राप्त होणार त्याविषयींचीं चिन्हें व लक्षणें दाखविण्यास हे विधि लावून दिले होते.

ते असे; बैल, बकरें, मेंढरीं आणि दुसरीं जनावरें, यांचा वध केल्याने पाप जातें व आत्म्याची शुद्धि होती, असें धार्मिक व सुधारलेले यहुदी मानीत नसत. परंतु



त्याचा अर्थ इतकाच कीं, ईश्वराने जें मोठें प्रायश्चित्त नेमिलें होतें, त्याजवर विश्वास ठेवून तेव्हांचे लोक बळी अर्पण करून आपल्या पापापासून शुद्ध होत. त्यावरून "रक्तपात केल्यावांचून पापाचें विमोचन होत नाहीं," ही जी शास्त्रांतली मुख्य गोष्ट, ती निरंतर त्यांच्या मनांत असावी. त्यावरूनहि पवित्र जो देव त्याविरुद्ध पाप केल्या-

चे जे दुःखकारक परिणाम त्यांचें त्यांस सबळ आणि प्रत्यक्ष प्रमाण होतें. आणि पापाचें शासन झाल्यावांचून राहत नाहीं, याविषयींच्या ईश्वरी न्यायत्वाचें त्यांस स्मरणहि होत असे. तसेंच, आपला प्राण वांचविण्याकरितां दुसरा कोणी आपला प्राण बळी देणार, असें दाखविलें गेलें.

---

### गोष्ट ३०. अभिलाषी यांचें शासन.

सिना डोंगराच्या आसमंतात् जेव्हां लोक एक वर्षपर्यंत राहिले, आणि मिसरदेशांतून निघण्याचा वार्षिक सण पाळिला, तेव्हां ढगाचा जो खांब, तो राहुटीवरून वर नेला गेला. आणि मग तेथून जाण्याकरितां लोकांनी सिद्धता केली, व आनंदानें केली असें वाटतें; कारण दुधानें व मधानें वाहत्या अस्या खनान देशांत ते तेथून थेट जाणार होते. परंतु यापूर्वीं मध्यें पुष्कळ गोष्टी घडून आल्या.

ते अरण्यांत तीन दिवसांच्या मजलीवर गेले नाहीं इतक्यांत त्यांची उत्कंठा कमी झाली. जो त्यामध्यें विविध समुदाय होता, त्यास दुसऱ्या आहाराची वांच्छा झाली. आणि इस्राएल लोक एकमेकापासीं रडूं व शोक करूं लागले. ते ह्मणाले कीं, "आह्मास मांस खायास कोण देईल! मिसरदेशांत आह्मी फुकट खाल्लें त्याची आह्मास आठवण आहे. तेथें आह्मी कांकड्या आणि खरबुजें, गंदणे कांदे, लसूण, हे खाल्ले. परंतु आतां आमचा जीव सुकला आहे. एथें आमच्या दृष्टीपुढें या मान्नाशिवाय दुसरें कांहीं नाहीं." हें ऐकून ईश्वर

ह्मणाला कीं, "तुह्मी उद्यांसाठीं शुद्ध व्हा ह्मणजे तुह्मी मांस खाल. तें तुह्मी एक दिवस किंवा दोन दिवस अथवा पांच दिवस अथवा दाहा दिवस अथवा वीस दिवस खाल इतकेंच नाहीं, तर एक महिनाभर व त्याची तुह्मास ओक येऊन तें तुमच्या नाकीं येई तोंपर्यंत खाल. कारण तुह्मामध्यें जो परमेश्वर आहे त्याचा तुह्मी धिक्कार केला आहे आणि त्याजसमोर रडून ह्मटलें आहे कीं, आह्मी मिसरदेशांतून कशासाठीं निघालों!" तेव्हां मोशे ह्मणाला कीं, "ज्या लोकांमध्यें मी आहें, ते साहालक्ष पायदळ आहेत. आणि तूं ह्मणालास कीं, त्यांस असें मांस देईन कीं, ते महिनाभर खातील." तेव्हां परमेश्वर मोश्यासीं बोलला कीं, "परमेश्वराचा हात आंखूड झाला काय!" नंतर मोश्याने इस्राएलाच्या संतानास एकत्र केलें. तेव्हां परमेश्वराने वारा सोडून समुद्राकडून लावे आणिले, आणि तळ्याच्या चहूंकडे सुमारे एक दिवसाची वाटपर्यंत सर्व भुईवर दोन हात उंच असे सोडिले.

तेव्हां लोकानी उठून त्या सगळ्या दिवसीं व सगळ्या रात्रीं व सगळ्या दुसऱ्या दिवसीं लावे गोळा केले. परंतु त्यानी ते खाल्यापूर्वीं त्यामध्यें पटकीचा रोग आला आणि ज्या लोकानी वांच्छा केली होती, त्यांतून बहुतेक मरण पावले; आणि तेथें पुरले गेले. या कारणावरून त्या जाग्यास "अभिलाषी यांचें मसण," असें नाव पडलें.

---

## गोष्ट ३१. गुप्त दूत अथवा हेर.

जेव्हां लोक पारानच्या अरण्यांत आले, तेव्हां ख-

नान देशाचा गुप्तपणें शोध काढावा ह्मणून मोशे याने प्रत्येक वंशांतील एकएक पुरुष काढून पाठविला. ते त्या देशाच्या दक्षिण शिमेपासून उत्तरेकडेस गेले आणि तेव्हां द्राक्षाच्या पहिल्या पिकाची वेळ होती ह्मणून त्यानीं एक डाळी द्राक्षाच्या घडासुद्धां तोडिली आणि ती एका काठीवर घालून दोघानी उचलून आणिली. याशिवाय अणखी त्यानीं डाळिंबें, अंजिरें आणि त्या देशाचीं दुसरीं फळेंहि आणिलीं. चाळीस दिवसांनंतर ते तळाजवळ पोहंचले, आणि ह्मणाले "ज्या देशांत त्वां आह्मास पाठविलेंस तेथें आह्मी पोहंचलों. आणि मद व दूध यांची भरती आहे, खरें; आणि हें त्यांतलें पळ आहे. तथापि त्या देशांतील लोक बळकट व तेथील नगरें कोटाचीं आणि फार मोठी आहेत. आणि तेथें आह्मी महाकाय पाहिले ते आनाकाचे वंशज आहेत. आणि आह्मी आमच्या दृष्टींत व त्यांच्या दृष्टींतहि टोळा एवढेच होतों.

तेव्हां सर्व समुदाया आपला स्वर उंचावून ओरडला आणि लोक त्या रात्रीं रडले आणि इस्राएलाच्या सर्व संतानानी मोश्याविषयीं आणि आहरोनाविषयीं कुरकूर केली. आणि सर्व समुदायाने त्यांजवळ ह्मटलें कीं, आह्मी मिसर देशांत मेलों असतों तर किती बरें होतें! अथवा या अरण्यांत मेलों असतों तर किती बरें झालें असतें! आणि परमेश्वराने आह्मास या देशांत कशासाठी आणिलें? आह्मी तरवारीने पडावें व आमचीं स्त्रीपोरें लुटीचीं व्हावीं कीं काय? मिसर देशांत परत जाणें बरें नाहीं कीं काय?" आणि ते एकमेकास ह्मणा-

ले कीं, "चला आपण आपणाला पुढारी करून मिसरांत परत जाऊं या." तेव्हां मोशे व आहरोन इस्राएल सर्व मंडळीच्या देखतां उपडे पडले. हेरांतील दोघेजण ह्मणजे यहोशवा आणि कालेब यानी आपलीं वस्त्रें फाडून समुदायास ह्मटलें कीं, "ज्या देशांत आह्मी हेरत फिरलों तो अतिशय चांगला देश आहे. जर आह्मावर परमेश्वराची प्रीति असती तर तो आह्मास त्या देशांत नेईल. मध व दूध जेथें वाहतो, तो देश आह्मास देईलच. तुह्मी मात्र परमेश्वराविरूद्ध फितुरी करूं नका, अथवा त्या देशांतील लोकांचें भय बाळगूं नका. कारण ते आह्मापुढें अन्नरूप होतील; त्यांची शक्ति त्यांजपासून गेली. आपल्यासच परमेश्वर अनुकूळ आहे ह्मणून त्यांस तुह्मी भिऊं नका." ते असें बोलल्यावर सर्व समुदायानी त्यांस धोंडमार करायास सांगितलें.

तेव्हां परमेश्वराचें वैभव राहुटींत सर्वांस दिसलें. मग ईश्वर ह्मणाला कीं, "हे लोक कोठवर मला संतापवितील, व त्यांमध्यें ज्या प्रमाण खुणा म्या दाखविल्या त्या असतांहि हे कोठवर मला मानणार नाहींत? जसें तुह्मी माझ्या कानासीं बोलला, तसें मी तुह्मास करीन. तुमचीं प्रेतें या रानांत पडतील आणि तुमचीं संतानें अरण्यांत चाळीस वर्षें भटकत फिरतील."

याप्रमाणें मिसर देशांतून आलेले जे होते त्यांतून जे वीस वर्षांच्या वयाचे जे होते ते सर्व यहोशवा व कालेब यांखेरीज अरण्यांत मरणार होते; आणि इस्राएल लोक अणखी एकुणचाळीस वर्षें अरण्यांत राहणार होती.

---

## गोष्ट ३२. इस्राएल लोकांचें कुरकुरणें.

परंतु इस्राएल लोकांचा हा शेवटचाच दंगा होता असे नाहीं तर लेवीच्या वंशांतील कोरा नामक एक नायक जो मोश्याचा चुलत भाऊ होता तो व दाथान आणि अबिराम, रऊबेन वंशांतील मुख्य हे एकत्र होऊन मोशे व आहरोन यांजवर उठले, आणि त्यानी महत्वाचा लोभ धरिला असा त्या तिघानी त्यांजवर दोष आणिला. आणि सर्व कारभारामध्यें व याज्ञिकीमध्यें सर्व समुदायाने समान वागावें असें ह्मणूं लागलें तेव्हां मोशे कोरास ह्मणाला कीं, "उद्यां तुह्मी आपलें धूपद्रव्य घेऊन परमेश्वरापुढें या; ह्मणजे त्याने कोणास निवडिलें आहे हें दृष्टीस पडेल." तेव्हां राहुटीच्या दारासमोर कोरा याने सर्व समुदाय मिळविला. मग मोशे लोकांस ह्मणाला कीं, तुह्मी या दुष्टमाणसांच्या राहुट्यांजवळून दूर व्हा, आणि त्यांच्या कशालाहि शिवूं नका; नाहींतर तुह्मी त्यांच्या अवघ्या पापामध्यें क्षय पावाल." मग भूमीने आपलें मुख पसरिलें आणि दाथान व अबिराम यांस, जें सर्व याचें होतें त्यासुद्धां आणि कोराचें जें होतें त्यासुद्धां गिळिलें. आणि परमेश्वराजवळून अग्नी निघाला, आणि त्याकडून कोरा व जे अडीचशें धूप जाळणारे पुरुष कोराबरोबर होते, ते जळून गेले. तेव्हां सर्व समुदाय कुरकुरून या मनुष्यांच्या मरणाच्या कारणाचा शब्द मोश्यास लावून बोलूं लागला. तेव्हां परमेश्वराने लोकामध्यें पटकीचा रोग पाठविला; आणि त्या वेळीं चौदा हजार सातशें मनुष्यें मरण पावलीं.

कादेशांमध्यें लोकांस पाणी नव्हतें, यास्तव ते मोश्या बरोबर भांडूं लागले. तेव्हां मोश्याला परमेश्वर ह्मणाला कीं, "तूं ती काठीं घे व आपला भाऊ आहरोन यासहित समुदाय मिळीव. मग तुह्मी त्यांच्या दृष्टीपुढें खडपासीं बोला; ह्मणजे तो आपलें पाणी देईल." नंतर मोशे आणि आहरोन यानी खडपापुढें समुदाय मिळविला. आणि तो त्यांस ह्मणाला, "अहो दंगेखोर तुह्मी आतां ऐका. आह्मी तुमच्यासाठीं या खडपांतून पाणी काढावें काय? मग मोश्याने आपला हात उभारून खडपावर दोनदां काठी मारिली; तेव्हां पुष्कळ पाणी निघालें, आणि समुदाय व त्यांचें पशू प्याले. परंतु मोशे व आहरोन यास परमेश्वर ह्मणाला कीं, "ज्यापेक्षां तुह्मी अविश्वासी होऊन इस्राएल लोकांची मजविषयीं खातरी करून दिल्ही नाहीं, त्या पेक्षां या मंडळीला जो देश म्या दिल्हा त्यांत तुह्मी त्यांस नेणार नाहीं." त्या पाण्यास मेरीबा म्हणजे भांडण्याचें पाणी असें त्या लोकानी नाव दिल्हें.

---

## गोष्ट ३३. पितळाचा सर्प.

चाळीसाव्या वर्षी जेव्हां इस्राएल लोक एदोमदेशाजवळून फिरत होते तेव्हां ते पुनः कुरकुरून म्हणाले कीं, "एथें भाकर नाहीं, आणि पाणीहि नाहीं; आणि या हलक्या भाकरीचा (मान्ना धान्याचा) आमच्या जिवास कंटाळा आला आहे." परमेश्वराने लोकांमध्यें जळजळण्याचे साप सोडिले. त्यानी लोकांस दंश केल्यामुळें त्यांतील पुष्कळ मेले.

तेव्हां ते मोश्याजवळ येऊन म्हणूं लागले कीं तुम्हीं पाप केलें आहे कारण आम्ही ईश्वराविरूद्ध व तुझ्याविरूद्ध बोललों आहों. यास्तव आह्मापासून सर्प न्यावे ह्मणून परमेराची तूं प्रार्थना कर. जेव्हां मोश्यानें लोकांकरितां प्रार्थना केली, तेव्हां परमेश्वराने मोश्याला सांगितलें; तूं एक साप करून काठीवर बसीव मग असें होईल कीं, जो कोणी डसलेला त्याजकडे पाहील तो वांचेल." मग मोश्याने एक पितळाचा सर्प केला, नंतर असें झालें कीं जर कोणास साप डसला असला तर तो त्या पितळी सर्पाकडे दृष्टी लावून वांचे.



जेव्हां आमचा प्रभु येशू ख्रीस्त या जगांत होता, तेव्हां त्याने असें स्पष्ट बोलून दाखविलें कीं, हा पितळी सर्प आपण जो जगाचा तारणारा त्याचें सुचक चिन्ह होतें. तो तेव्हां असें ह्मणाला कीं, "अरण्यांत मोश्याने जसा सर्प उंच केला, तसें मनुष्यपुत्र (म्हणजे येशू) उंच केला जाईल; त्यावर जो कोणी विश्वास ठेवील त्याचा नाश न व्हावा परंतु त्याला अक्षय जीवन प्राप्त व्हावें."

पाप केल्याने आपण देवाचेक्रोध पात्र झालों, असें जे समजतात त्याला या गोष्टीपासून आशा प्राप्त व्हावी. त्या लोकांची प्रकृति सर्पांनी जसी बिघडली, तसे सांप्रत मनुष्यांचे आत्मे पापाने बिघडले आहेत. जसें त्या वेळेस मानवी उपाय चालले नाहींत तसें आतां येशूकडून जो तारणोपाय त्यावांचून दुसरा नाहीं. जसें त्या वेळेस विश्वास ठेविल्याशिवाय कोणी निरोगी झाला नाहीं, तसें हल्लीं वधस्तंभीं दिल्हेला जो येशू त्याजवळ विश्वास ठेविल्याखेरीज कोणाची पापापासून सुटका होत नाहीं. पवित्र आत्मा आपल्याला देण्याकरितां सर्वांनी देवाची प्रार्थना करावी. "जर तुह्मी पापी असतां आपल्या लेकरास चांगला पदार्थ द्यावयास जाणतां,तर जे आकाशांतील बापाजवळ मागतात, त्यांस तो किती विशेषाने पवित्र आत्मा देईल!" असें शास्त्रांतील वाक्य आहे.

---

## गोष्ट ३४ बालाम.

जेव्हां तीं चाळीस वर्षें पूर्ण होत आलीं, तेव्हां देशाचें जिंकणें प्रारंभ झालें. इस्राएल लोकानी आमोर लोकांच्या सिहोनराजा व बाषान एथचा राजा जो ओग त्यांस मारिलें; आणि यार्देन नदीच्या तिरीं मोआबाच्या मैदानांत आपला तळ दिल्हा. तेव्हां मोआबी लोकांचा राजा बालाक याने आराम देशांत बालाम या नावाच्या एका भविष्यवक्त्याकडे दूत पाठवून त्यास सांगितलें कीं, "तूं ये, आणि मजकरितां या लोकांस शाप दे. कां कीं हे मजपेक्षां बळकट आहेत." परंतु देव बालामास ह्मणाला

कीं, "तूं त्यांच्या संगतीं जाऊं नको. त्या लोकांस शाप देऊं नको. कारण कीं ते आशीर्वादित आहेत." तथापि बालाकाने पुनः बालामास बोलावूं पाठविलें आणि पहिल्यापेक्षां अधिक मोठ्या मानाचे कारभारी पाठविले. शेवटीं बालाम मान्य होऊन त्यांजबरोबर गेला. त्यावेळीं प्रभूचा दूत त्यास मार्गांत भेटावयास आला आणि नग्न तरवार उपसून उभा राहिला. त्याला गाढवी पाहून वाटेंतून वळली परंतु बालामाने दूतांस पाहिलें नाहीं, ह्मणून त्याने तिला मारिलें. तेव्हां ती गाढवी खालीं बसली. मग पुनः बालामाने तिला मारिलें. तेव्हां परमेश्वराने गाढवीचें तोंड मोकळें केलें, आणि ती मनुष्य वाणीने बोलूं लागली. "म्या तुझें काय केलें ह्मणून त्वां मला मारिलेंस ?" मग परमेश्वराने बालामाचे डोळे उघडिले आणि त्याने तो दूत पाहिला. मग तो दूत त्यास म्हणाला, "तूं त्या माणसांसंगतीं जा; परंतु जी गोष्ट मी तुला सांगेन ती मात्र तूं बोल.

नंतर बालाम बालाकराजापासीं आला आणि त्याजबरोबर त्याने एका उंच स्थानीं होमार्पण केलें. नंतर तो आपलें काव्य उच्चारीत म्हणाला "ज्यांस देवाने शाप दिल्हा नाहीं, त्यांस मी कसा शाप देऊं? ज्याचा धिक्कार परमेश्वराने केला नाहीं त्याचा मी कसा धिक्कार करूं ? पाहा मी आशीर्वाद द्यायाला आज्ञा पावलों; त्याने आशीर्वाद दिल्हा हा माझ्याने फिरवत नाहीं." मग त्याने त्यांस तीनदां आशीर्वाद दिल्हा. तेव्हां बालाक बालामास म्हणाला, "माझ्या शत्रूंस शाप देण्याकरितां म्या तुला बोलाविलें, आणि पाहा! त्वां आतां तीन वेळां

त्यांस आशीर्वाद दिल्हास. म्या ह्मटलें कीं, तुला मोठ्या मानास चढवीन परंतु पाहा, परमेश्वराने गौरवाविषयीं



तुला निवारिलें आहे." नंतर बालाम आपल्या ठिकाणीं माघारां गेला. मग मोआब लोकांस इस्राएलाने जिंकिलें.

---

## गोष्ट ३५. मोशे याचें मरण.

ज्या सर्व मनुष्यांस मोश्याने मिसरदेशाबाहेर आणिलें होतें, त्यांतून जेव्हां इस्राएललोक वचन दिल्हेल्या देशांत आले, तेव्हां यहोशवा व कालेब हे दोघेमात्र जीवंत होते बाकीचे सर्व प्रौढ मरण पावले. शेवटीं देवापासून मोश्याला बोलावणें आलें कीं, "नेबो डोंगर मोआब देशांत यरीहोच्या समोर आहे; त्यावर तूं चढ. आणि खनान देश जो इस्राएल संतानास मी वतन करून देतों, त्या देशास तूं समोर पाहसील परंतु तिकडे जाणार नाहींस." नं-

तर मोश्याने आपल्या लोकांचा निरोप घेतला. ईश्वराने जे त्यांजवर उपकार केले होते त्यांची त्याने त्यांस आठवण दिल्हीं. त्याच्या सर्व आज्ञा त्याने पुनः सांगितल्या, ईश्वराचे आशीर्वाद व शाप कसकसे मिळतील हें त्यांस जाणिवले. आणि त्यांस हें वचन दिल्हें, "परमेश्वर तुमच्या भावांतून मजसारिखा भविष्यभाषी तुम्हासाठीं उत्पन्न करील. त्याचें तुम्ही ऐका." नंतर तो पर्वतावर गेला आणि तेथें मरण पावला. आणि परमेश्वराने त्यास पुरलें, आणि त्याची मसण खांच कोणाला ठाऊक नव्हती. मोशे मेला तेव्हां त्याचें वय १२० वर्षांचें होतें; तथापि त्याची दृष्टि मंद झाली नव्हती अथवा त्याची शक्ति क्षीण झाली नव्हती.

---

## गोष्ट ३६. यहोशवा आणि यरिखो शहराचें जिंकणें.

जसा देव मोश्याबरोबर होता, तसाच नंतर तो यहोशवाबरोबरहि होता. आणि जसें मोश्याने इस्राएल लोकांस समुद्रांतून पार नेलें, तसें यहोशवाने त्यांस यार्देन नदीच्या पैल तिरीं नेलें. त्या नदीचें पाणी दुभागलें; वरला भाग वाहण्या बंद होऊन लोक पार होईपर्यंत तसाच थांबला. त्याप्रमाणें त्यांचा खनान देशांत प्रवेश झाल्यानंतर त्यांस यरिखो शहर जिंकण्याचें होतें. तें मोठें बळकट शहर होतें. परमेश्वर ह्मणाला कीं, "पाहा, यरिखो आणि त्याचा राजा यांस मी तुझ्या हातांत दिल्हें आहे." नंतर परमेश्वराच्या आज्ञेवरून उपाध्ये करा-

राची पेटी, हातांत करणे व बकऱ्याचीं शिंगें घेऊन शहराच्या भोवतां फिरले. त्यांच्या मागें व पुढें शस्त्रधारी माणसें गेलीं, याप्रमाणें त्यानी साहा दिवस केलें. सातव्या दिवसीं उपाध्ये लोकानी करणे वाजविले आणि यहोशवा लोकांस ह्मणाला, "तुह्मी जयघोष करा, कां कीं परमेश्वराने तुह्मास हें नगर दिल्हें आहे." नंतर असें झालें कीं, जेव्हां लोकानी करण्याचा नाद ऐकिला आणि ते मोठ्याने जयघोष करूं लागले, तेव्हां भिंत खालीं पडली आणि ते शहरांत गेले. त्यानी त्यांतील राहणाऱ्यांचा वध केला व त्यांचीं घरें जाळून टाकिलीं.

परंतु या दुःखप्रद शिक्षेपासून एक कुटुंब मात्र वांचलें. यहोशवाने राहाब आणि तिच्या बापाच्या घरांतील माणसें आणि जें कांहीं तिचें होतें त्याचा बचाव केला. याचें कारण असें होतें कीं, येरिखोमध्यें यहोशवाने दोघे हेर पाठविले होते; ते जेव्हां शत्रूंच्या हातीं सांपडण्याच्या संकटांत होते, तेव्हां तिने त्यांचें भय दूर करून त्यांस सुरक्षितपणें परत पाठवून दिल्हें होतें. परमेश्वर जो इस्राएल लोकांचा देव, त्याजवर विश्वास ठेवून, तो आपल्या लोकाकरितां युद्ध करील व त्यांच्या शत्रूवर त्यांस जय प्राप्त करून देईल अशा समजीने तिने हें केलें होतें.

---

## गोष्ट ३७. गिब्होनी लोक.

दुसरेहि लोक इस्राएल लोकांस भीत होते आणि ते आपलें संरक्षण होण्याकारितां उपाय करूं लागले. ते गिब्होन

प्रांतांतील लोक होते. यहोशवाने येरिखो व आई एथें जें केलें तें जेव्हां त्यानीं ऐकलें तेव्हां त्यानीं दूर देशांतले वकील यांचें मीस धरून जुन्या गोण्या व द्राक्षरसाच्या डबक्या फुटलेल्या व शिवलेल्या अस्या, व जुनीं वस्त्रें व सुखलेल्या भाकऱ्या गाढवावर घेतल्या. ते यहोशवाजवळ आले आणि सांगूं लागले कीं, “आह्मी फार दूर देशाहून आलों आहों. इतके दुरून आलों आहों कीं आमचीं प्रवासामुळें सर्व वस्त्रें झिजून गेलीं आहेत व आह्मी निघाल्यापासून फार दिवस झाले आहेत ह्मणून आमचें अन्न बिघडलें आहे. तुह्माजवळ करार करावा ह्मणून आलों.” यहोशवाला त्यांचें बोलणें खरें वाटलें आणि ईश्वराचें अनुमोदन घेतल्यावांचून गिब्होनी लोक ह्मणाले तसें त्यानें केलें. थोडके दिवसांनंतर त्यांचें कपट कळून आलें. यहोशवानें त्यांच्यासीं सल्ला केला होता ह्मणून त्याच्याने त्यांचा नाश करवला नाहीं. परंतु त्यानें त्यांचीं शहरें घेतलीं आणि इस्राएल लोकांकरितां व प्रभूच्या स्थंडिलाकरितां त्यानां लांकूड कापण्याचें व पाणी भरण्याचें काम करावयास लाविलें. मग ते पिढी दरपिढी हें काम करीत होते.

---

## गोष्ट ३८. खनानी लोकांचा पराभव.

यहोशवा खनानी लोकानां जिंकून त्यांचे लाहान एकतीस राजे यांला मारी तोंपर्यंत ईश्वरानें यास सहाय केलें. आजलोन खिंडेंतील लढाईच्या वेळीं यहोशवा बोलतांच सूर्य व चंद्र स्थीर राहिले, आणि ईश्वरानें गारांचा भडमार करून आमोरी लोकांस ठार मारिलें. कांहीं वर्षां-

नंतर जय इतका झाला कीं बारा जातींमध्यें तो देश वांटून देण्यास यहोशवास शक्ति आली. रहुबेन व गाड व मनास्साची अर्धी जात जाऊन नदीच्या पलिकडल्या बाजूस वस्ती करूं लागली. आणि दुसऱ्या साडेनऊ जाती जार्डन नदी व समुद्र यांमधल्या देशांत वस्ती करूं लागल्या. लेवी जातीस कांहीं निराळें वतन दिल्हें नव्हतें परंतु दुसऱ्या जातीच्या शहरांतून कांहीं शहरें दिल्हीं होतीं. शीलो गांवामध्यें देवानी राहुटी ह्मणजे मंडपदेऊळ व कराराचें तारूं ठेविलें होतें. जेव्हां यहोशवा एकशें दाहा वर्षांचा झाला आणि जेव्हां सर्व कामें आटोपलीं तेव्हां आपण त्यांची रजा घ्यावी ह्मणून इस्राएल लोकांस त्याने शेकेम एथें एकत्र जमविलें. त्याने त्यांनां ईश्वराने त्यांजवर दया केली होती तीविषयीं आठवण दिल्ही; आणि ते विश्वासू व आज्ञाधारक व्हावे ह्मणून त्यांस फार उपदेश केला. तो ह्मणाला प्रभूस भ्या आणि मनापासून व खरेपणाने त्याची सेवा करा आणि जर तुह्मास प्रभूची सेवा करणें हें वाईट वाटत असेल तर कोणाची सेवा कराल त्याविषयीं आज शोध करा. परंतु मी व माझें कुटुंबहि प्रभूची सेवा करणार. तेव्हां सर्व लोक ह्मणाले कीं दुसऱ्या देवाची सेवा आमच्याजवळून न घडो असें ईश्वर करो.

ईश्वराने इस्राएली लोकांस त्या लोकांचा नाश करावयास सांगितलें व त्यांचीं शहरें व देश घ्यावयास सांगितलें ह्मणून तुह्मास कदाचित आश्चर्य वाटेल तर याचें कारण असें कीं त्या लोकानी जो एकच खरा ईश्वर त्यास सोडून दुसरे आपले देव मांडले होते व त्या देवाची पुजा

व सेवा करीत; आणि सर्व प्रकारें इतके दुष्ट झाले कीं शेवटीं ईश्वरास त्यांची गोष्ट साहली नाहीं. दुसऱ्या वेळीं जेव्हां ईश्वराने आपला राग पापामुळें दाखविला, तेव्हां त्याने जलप्रळय, अग्नी गंधक इत्यादिक प्रकारें-करून लोकांचें शासन केलें होतें. परंतु ईश्वराने आपल्या वचनाप्रमाणें ज्या लोकानी त्याचें नाव सोडलें त्या लोकानां शासन इस्राएल लोकांकडून करविलें.

आह्मास असें वाटतें कीं जर खनानी लोकानीं आपल्या पापाविषयीं पश्चात्ताप केला असता व मनापासून रडत व विनंती करीत प्रभूकडे वळले असते तर प्रभूने जसे राहाब व तिचें कुटुंब यांवर दया केली तसें त्यांवरहि प्रभु दया करिता. कारण कीं प्रभु हा प्रितीचा देव आहे. दुष्टांचा नाश करण्याने त्यास आनंद होत नाहीं परंतु दुष्टाने आपला दुष्ट मार्ग सोडावा ही त्याची इच्छा आहे.

---

## गोष्ट ३९. न्यायाधीश.

यहोशवाच्या मरणानंतर इस्राएल लोक आपल्या वचनाप्रमाणें राहिले नाहींत. ते बहुत वेळा दुसऱ्या लोकांच्या देवाची भक्ती करूं लागले. तेव्हां ईश्वराने त्यांस त्यांच्या शत्रूंच्या स्वाधीन केलें. आणि जेव्हां त्यानी आपल्या पापाचा पश्चात्ताप केला, तेव्हां परमेश्वराने त्यांकरितां, सेनापति व न्यायाधीश उत्पन्न करून त्यांस त्यांच्या शत्रूंपासून मुक्त केलें.

एका वेळीं असें झालें कीं, मिद्यानी लोक अरण्यांतून

खनान देशांत आले आणि शेतांत जें कांहीं सर्व होतें त्याचा विध्वंस केला, आणि गुरें बाहेर हांकून लाविलीं. याप्रमाणें ते एकसारिखे सात वर्षेंपर्यंत येऊन दंगा करीत, पण त्यांस अटकाव करण्यास कोणी नव्हते. तेव्हां देवाने मनास्स्याच्या घराण्यांतून एक तरूण माणूस उत्पन्न केला. त्यास परमेश्वराचा दूत दिसून ह्मणाला, "हे पराक्रमी शूर पुरुषा, परमेश्वर तुजसंगतीं आहे." तेव्हां गिदोन त्यास ह्मणाला, "हे माझ्या धन्या, जर परमेश्वर मजसंगतीं असतो तर आह्मावर असें संकट कां पडतें? आणि आमच्या वडिलांनीं जीं आह्मास त्याचीं चमत्कारीक कृत्यें सांगितलीं, तीं कोठें आहेत?' तेव्हां परमेश्वराने त्याजकडे पाहिलें आणि ह्मटलें, "तूं आपल्या शक्तीने जा आणि तूं मिद्यानी लोकांच्या हातांतून इस्राएलास सोडविसील. म्या तुला पाठविलें नाहीं कीं काय?" तेव्हां गिदोनाने उत्तर दिल्हें कीं, "हे माझ्या प्रभू, मी इस्राएलास कोठून मुक्त करूं? पाहा मनास्स्यामध्यें माझें कुटुंब गरीब आहे, आणि माझ्या बापाच्या घरांत मी सर्वांहून धाकटा आहे." तेव्हां परमेश्वर त्यास ह्मणाला, "मी तुजबरोबर खचित राहीन. आणि एका माणसाप्रमाणें तूं सर्व मिद्यानी लोकांस मारसील."

नंतर गिदोनाने प्रथम आपल्या बापाचें मूर्त्तीच्या भजनाचें वन होतें तें तोडून टाकिलें. त्यामध्यें बालदेवाची पूजा करीत. हें मोठ्या धैर्याचें कृत्य होतें कारण जे सर्व बालदेवाची पूजा करीत, ते आपल्याला मारायास जपतील असें त्याला समजलें. परंतु त्याचा बाप त्यांस ह्मणाला कीं, "तुह्मी बालाचा पक्ष धरून बोलाल कीं

काय ! जर तो देव असला, तर त्यास आपणाकरितां बोलूं द्या." इतकें झालें असतांहि आपणास जें बोलावणें आलें तें खरोखर देवापासून आहे, याविषयीं पक्की खात्री होण्यास गिदोनानें देवापाशीं खूण मागितली. तो ह्मणाला कीं, "पाहा, मी जमीनीवर लोहकरीचें कात्रण ठेवीन आणि जर त्या कात्रणावरच दंव पडला आणि त्याच्या जवळची सर्व जमीन सुकी असली तर तूं इस्राएल लोकांस माझ्या हातानें सोडविसील असें मी जाणेन." आणि नंतर जेव्हां तो प्रातःकाळीं उठला, तेव्हां त्यानें लोहकरींतून एक कटोराभर पाणी पिळून काढिलें. नंतर गिदोन यानें पुनः एक वेळ देवापाशीं विचारायास धैर्य केलें. तो ह्मणाला कीं, "पुनः एक वेळ मात्र खरें करून पाहण्यास मी प्रार्थना करितों. आतां लोहकर मात्र सुकी राहून सर्व जमीनीवर दंव पडावा." तेव्हां त्या रात्रीं देवानें तसें केलें. लोहकर मात्र सुकी राहून सर्व जमिनीवर दंव होता.

नंतर गिदोनानें उठून लोकांतून बत्तीस हजार मनुष्यांचें सैन्य जमा केलें. आणि ईश्वराच्या आज्ञेवरून असा दांडोरा पिटविला कीं, "जो कोणी भीत असेल त्यानें परत जावें." (नेमप्रकरणाचा २० वा अध्याय व ८ वी ओवी पाहावी.) असें केल्यावर बावीस हजारांनीं त्यांस सोडिलें. तेव्हां परमेश्वर गिदोनास ह्मणाला कीं, "अद्याप लोक पुष्कळ आहेत. त्यांस पाण्यापाशीं आण ह्मणजे तुजकरितां मी त्यांची परीक्षा पाहीन." असें सांगितल्यावर त्यानें त्यांस पाण्याजवळ आणिलें. नंतर गिदोनास परमेश्वर ह्मणाला कीं, "जो कोणी कुत्र्याप्रमाणें

आपल्या जिभेने चाटीत पाणी पितो, त्यास तूं एकिकडे ठेव; आणि जो पिण्याकरितां गुडघे टेंकितो, त्यासहि वेगळा ठेव." आणि ज्यांनी आपल्या तोंडास हात लावून कुत्र्याप्रमाणें पाणी प्यालें, ते तीनशें मनुष्य होते. नंतर परमेश्वर गिदोनास ह्मणाला कीं, "ज्या तीनशें मनुष्यांनीं कुत्र्याप्रमाणें पाणी प्यालें त्यांकरवीं मी तुला रक्षीन



आणि मिद्यानी लोक तुझ्या हातीं देईन." तेव्हां गिदोनाने तीनशें खेरीज करून बाकी सर्वांस परत पाठविलें. कां कीं असें न केल्यास इस्त्राएल लोक बढाई करून ह्मणतात कीं, आह्मी आपल्या शक्तीने जिंकलों आहों.

गिदोनाने आपल्या माणसांच्या तीन टोळ्या केल्या आणि प्रत्येकाजवळ मातीच्या घागरींत घालून एक एक मशाल आणि हातांत एकएक शिंग दिल्हें. असी तयारी

करून ते कोणास न दिसतां मध्यरात्रीं मिद्यानी लोकांच्या छावणींत तीन बाजूने शिरले. आणि ते युद्धाच्या जय शब्दाने ओरडून ह्मणाले कीं, "परमेश्वराची व गिदोनाची तरवार." नंतर त्यांच्या धगधगीत मशाली आणि करण्याचा आवाज व घागरी फोडण्याचा विलक्षण नाद, यांहींकरून त्यांहीं आपल्या शत्रूंस निद्रेंतून जागृत करून इतकें भयाभीत केलें कीं, त्या गोंधळांत ते आपल्या मित्रांसच शत्रू मानून त्यांवर तरवार मारूं लागले. आणि चहुंकडे लोकांचा पळ सुटला. आणि गिलाद पर्वतावरील सर्व लोक शत्रूचा पाठलाग करायास आले. आणि मिद्यान्यांचे पुष्कळ समुदाय मारले गेले. आणि बहुत लुटले गेले.



याप्रमाणें जय मिळवून जेव्हां गिदोन परत स्वदेशीं आला, तेव्हां त्यास आपला राजा करावा असें लोकांनी इच्छिलें. परंतु त्याने तें मान्य न करितां ह्मटलें कीं, "परमेश्वर तुह्मावर राज्य करील."

## गोष्ट ४०. रूथ.

लढाईच्या पुष्कळ गोष्टी झाल्यानंतर आपण गावांतील कुटुंबाच्या गोष्टींविषयीं शास्त्रांत वाचतों. न्यायाधीशाच्या वेळीं देशामध्यें एक दुष्काळ पडला होता. तेव्हां बेथलेहेम एथील एक मनुष्य आपली बायको नाहामी व दोघे पुत्र घेऊन मोआब देशांत जाऊन राहिला तेथें त्या मुलानी मोआबी लोकांच्या दोन कन्यांसीं लग्न केलें. त्यांचीं नांवें ओरपा आणि रूथ. कांहीं दिवसानी तो मनुष्य मरण पावला. आणि त्याचे दोघे पुत्रहि मेले. तेव्हां नाहामी गरीब विधवेप्रमाणें आपल्या बरोबर दोन सुना घेऊन स्वदेशीं जाण्यास निघाली. तेव्हां तिने त्यास आपल्या देशीं राहावयास समजाविलें. त्यांतून एकजण ओरपा राहिली. परंतु दुसरी जी रूथ होती ती ह्मणाली कीं, "तुला सोडण्याविषयीं माझी विनवणी करूं नको. कां कीं जिकडे तूं जासील तिकडे मी जाईन आणि जेथें तूं राहसील तेथें मी राहीन. तुझे लोक ते माझे लोक होतील आणि तुझा देव तो माझा देव होईल. जेथें तूं मरसील तेथें मी मरेन व तेथें पुरली जाईन."

जेव्हां नाहामी बेथलेहेमास आली, तेव्हां लोकानी तिला ओळखिलें नाहीं. ते ह्मणाले कीं, "ही नाहामी कीं काय!" त्यांस ती ह्मणाली कीं, "मला नाहामी (याचा अर्थ आवडती असा आहे) ह्मणूं नका. मला मारा (याचा अर्थ कडू असा आहे) ह्मणा. मी तृप्त होऊन निघालें आणि परमेश्वराने मला घरीं रिकामी परत आणिलें. त्या वेळीं जव धान्य कापण्याची वेळ होती ह्मणून रूथ

शेतांत दाणे टिपायास गेली. आणि देवाच्या योजनेनें असें झालें कीं ती, बोआज नावाचा एक तिच्या मृत नवऱ्याचा गोत्रज त्याच्या शेतांत आली. जेव्हां बोआज आपल्या धान्य कापणाऱ्याजवळ आला, तेव्हां त्याने ती कोण आहे असें पुसलें. मग तिजजवळ येऊन तो ममतेने बोलला. तो असें ह्मणाला कीं, "तूं आपल्या नवऱ्याच्या मरणानंतर सासूचें काय केलेंस हें मला माहीत आहे. प्रभु तुझ्या कामाची फेड करो. आणि इस्राएल लोकांचा परमेश्वर जो देव ज्याच्या पंखांचा आश्रय करायाला तूं आली आहेस, त्याजपासून तुला पूर्ण प्रतिफल प्राप्त होवो." नंतर त्याने आपल्या तरुणांस तिजकडे ममतेने वागायास सांगितलें; आणि तिजकरितां कितीएक मुठी धान्य तेथें पडूं द्यावयास सांगितलें.

हें सर्व वर्त्तमान रूथ इणे आपल्या सासूस सांगितलें. तेव्हां नाहामी ह्मणाली कीं, तो आमचा सोयरा आहे. परमेश्वर ज्याने जिवंतांवरून व मेलेल्यांवरून आपली दया काढली नाहीं, तो सुवंदित असो.

नंतर सर्व कापणीच्या दिवसांत बोआज याने गरीब रूथ इची उत्तम स्थिति पाहून त्याची तिजवर प्रीति झाली. परंतु इस्राएल लोकांत असा नियम होता कीं जर एकादा लग्न केलेला मनुष्य संततीवांचून मरण पावला, तर त्याच्या जवळच्या गोत्रजाने त्याच्या विधवेसीं लग्न लावावें. ही गोष्ट रूथेस तिच्या सासूने सांगितल्यावर तिने आपल्या देशाच्या चालीप्रमाणें बोआज याजला त्याविषयीं सांगितलें आणि सुगीचे दिवस गेल्यावर त्याचें लग्न झालें.

ही गरीब मोआबी स्त्री एका मोठ्या राजाची आजी झाली. तिला ईश्वराने एक पुत्र दिल्हा, त्याचें नांव ओबेद असें ठेविलें. नंतर ओबेदाने यीशायास जन्म दिल्हा, तो दाविद राजाचा बाप होता. आह्मी दाविदाची गोष्ट थोडक्यानंतर सांगूं.

याप्रमाणें रूथ ही दाविदाचा जो ईश्वरी पुत्र येशू ख्रीस्त त्याची एक पूर्वज झाली. त्या येशूच्या मरणाने यहूदी व इतर विधर्मी लोक हे एक झाले. त्याच्या नावावर जे विश्वास ठेवितात त्यांवर त्याची कृपा आहे. आणि त्याच्या योगेंकरून सर्व देश गोत्रें, लोक व भाषा यांतले कोणाच्याने मोजवणार नाहींत असे पुष्कळ तारिले जातील.

---

## गोष्ट ४१. एली आणि शमुवेल.

लढणाऱ्या न्यायाधीशानंतर एली जो मुख्य उपाध्या तो इस्राएल लोकांत न्यायाधीश होता. आणि मोशे याच्या नियमाप्रमाणें सर्वदा असेंच असावें लागलें. शिलोमध्यें देवाची राहुटी होती आणि सणाच्या दिवसीं इस्राएल लोक तेथें एकत्र होत. एका दिवसीं एलीने असें पाहिलें कीं, एक स्त्री राहुटीच्या बाहेरल्या भागांत प्रार्थना करीत आहे. त्याने तिचे ओठ हालतानां मात्र पाहिले; परंतु शब्द ऐकूं आले नाहींत कारण ती आपल्या अंतःकरणांत मात्र बोलत होती. हें पाहून एलीला वाटलें कीं ती मस्त झाली आहे. परंतु असें समजण्यांत एलीने त्या गरीब दुःखित स्त्रीचा मोठा अन्याय केला.

ती आपणास पुत्र व्हावा ह्मणून ईश्वराची प्रार्थना करीत होती. कारण तिचें लग्न होऊन बहुत दिवस झाले होते आणि तिला एकहि संतान नव्हतें. जेव्हां एलीला त्या स्त्रीपासून हें समजलें, तेव्हां तो तिला ह्मणाला कीं, "सुखरूप जा आणि इस्राएलाचा देव त्याजपासीं जे विनंती करून त्वां मागितलें तें तुला देवो." मग हान्ना (असें त्या बायकोचें नांव) निघून गेली. आणि आतां तिचें तोंड म्लान नव्हतें. कां कीं तिने आपलें अंतःकरण ईश्वरासमोर मोकळें केलें. नंतर देवाने तिची विनंती मान्य केली, आणि तिला पुत्र दिल्हा. त्याचें तिने शमुवेल ह्मणजे देवापासीं मागितलेला, असें नांव ठेविलें.

कांहीं वर्षांनंतर त्या मुलाच्या आईबापानी त्यास आपणाबरोबर शिलो एथें सणाकरितां आणिलें, आणि उपाध्यावर हवाला घालून त्यास त्याच्या स्वाधीन केलें. नंतर पुढें जेव्हां तीं प्रतिवर्षीं उत्साहास येत, तेव्हां त्याचें वर्त्तमान ऐकत. नंतर देव स्वतां त्या मुलासीं बोलला आणि त्याने त्यास भविष्यवाद्याचें काम दिल्हें. मुख्य याजकाचे मुलगे होफनी व फिनहास हे अगदी हलके व्यसनी मनुष्य होते आणि त्यानी आपल्या दुष्ट वर्तणुकीमुळें देवाचें पवित्रालय विटाळलें, एलीने आपल्या पुत्रांस ते ईश्वराचे किती मोठे अपराध करितात तें सांगितलें; परंतु बापाच्या व न्यायाधीशाच्या सत्तेने जसी त्यांस ताबेंत आणून शिक्षा करावी लागली तसी त्याने केली नाहीं लाडिकपणाने त्याने त्यांची फार प्रीति केली.

एका रात्रीं परमेश्वराने शमुवेलास हाक मारिली. तेव्हां तो मूल उठून, एलीने आपणास बोलाविलें असें समजून

त्याजपासीं गेला, असें दोनदा झालें. तेव्हां एली समजला कीं, परमेश्वराने याला हाक मारिली आहे. मग तो शमुवेलास ह्मणाला, "जर तो पुनः तुला हाक मारील, तर तूं असें ह्मण कीं, हे प्रभू बोल; कां कीं तुझा सेवक ऐकत आहे." नंतर पुनः शमुवेलास परमेश्वराची वाणी असी ऐकूं आली, "शमुवेल, शमुवेल." तेव्हां शमुवेल ह्मणाला, हे प्रभू बोल, तुझा सेवक ऐकत आहे. मग परमेश्वर असें बोलला कीं, "पाहा इस्राएल लोकांमध्यें मी असें कार्य करणार आहे कीं जो कोणी तें ऐकेल त्याचे कान दुखतील; एलीच्या कुटुंबाविषयीं जें कांहीं म्या सांगितलें आहे तें मी करीन. जी दुष्टाई त्याला माहीत आहे तिजमुळें मी त्याच्या कुटुंबास शिक्षा करीन असा माझा निश्चय त्याला कळला आहे. त्याच्या पुत्रानीं बहुत निंद्य केलें आणि त्याने त्याला निषेधिलें नाहीं."

नंतर प्रातःकाळीं, एलीने शमुवेलास विचारिलें कीं, "जी गोष्ट परमेश्वराने तुला कळविली ती काय आहे? ती मजपासून गुप्त ठेवूं नको." तेव्हां जरी ती गोष्ट त्यास दुःखकारक होती, तरी शमुवेलास एलीला सांगणें प्राप्त झालें. मग एली ह्मणाला, "तो प्रभु आहे; त्यास जें बरें वाटेल, तें त्याने करावें." मग ती ईश्वराने भाकित केलेली गोष्ट चुकली नाहीं. एक लढाई चालूं झाली; तींत पलिष्ट्यानी इस्राएलांचा पराजय केला. तेव्हां पुनः इस्राएल लोकांला हिम्मत होण्यास वडिलानी देवाची कराराची पेटी छावणींत आणविली. ती दोघा तरूण उपाध्यानी नेली. तेव्हां एली जो ९८ वर्षांचा ह्मातारा माणूस, तो शहराच्या दरवाज्यापासीं मोठ्या उत्कंठेने

खबरेची वाट पाहत वसला होता इतक्यांत एक जासूद ज्याचीं वस्त्रें फाटलेलीं व ज्याचा चेहरा दुःखाने भरलेला असा आला. त्यास एली पुसतो, लढाई कसी चालली आहे? त्यास जासूद उत्तर देतो कीं, "पलिष्ट्यांपुढून इस्राएल पळाले. तुझे दोन पुत्र मरण पावले; आणि शत्रूंनी देवाची पेटीहि नेली आहेत." एली हें ऐकून आपल्या आसनावरून मागें पडला आणि त्याची मान मोडली.

नंतर पलिष्ट्यानी देवाची पेटी अशदोद शहरांत नेली आणि दागोन जो त्यांचा देव त्याच्या मूर्त्तीच्या देवळांत ठेविली. नंतर दुसऱ्या प्रातःकाळीं दागोन तिजपुढें डोकें आणि हात कापलेला असा भूमीवर पडला होता. तें पाहून अशदोदकरी यानी ती देवाची पेटी एकरोन एथें नेली परंतु तेथेंहि त्यांस त्रासावांचून दुसरें कांहीं नव्हतें. यास्तव सात महिन्यानी त्यानी ती देवाची पेटी परत पाठविली. परंतु इस्राएल लोकांवर त्यांचा वीस वर्षें अधिकार चालला. तो काळ इस्राएलांस दुःखाचा होता.

परंतु जेव्हां शमुवेलाने त्यास त्यांच्या वडिलांच्या देवाकडे फिरविलें, तेव्हां देवाने त्यास पलिष्टी लोकांवर जय दिल्हा, आणि पलिष्ट्यानीं जीं नगरें घेतलीं होतीं, तीं त्यानीं परत घेतलीं. नंतर शमुवेलाने पलिष्ट्यांच्या देशाच्या मर्यादेवर एक दगड उभा केला आणि त्यावर असें लिहिलें कीं, "एथपर्यंत परमेश्वराने आमचें साहाय्य केलें आहे."

शमुवेलाने प्रमाणिकपणाने व नीतिमत्वाने राज्य केलें

आणि इस्राएल लोकांवर जे न्यायाधीश झाले त्या सर्वांत हा उत्तम होता.

---

## गोष्ट ४२. शमुवेल आणि शाऊल.

जेव्हां शमुवेल म्हातारा झाला तेव्हां त्याने आपल्या न्यायाधीशपणाच्या कामापैकी कांहीं आपल्या पुत्रास करायास सांगितलें. परंतु ते लोभाविष्ट होऊन आपला जो सत्वशील व निर्लोभी बाप त्याप्रमाणें वागले नाहींत. तेव्हां इस्राएलाच्या सर्व वंशांतील वडील मिळून आपणावर आतां न्यायाधीश नको पण राजा पाहिजे असें शमुवेलास सांगण्यास रामा एथें गेले. शमुवेलास त्यांचें बोलणें ऐकून ठीक वाटलें नाहीं. परंतु त्यास देवाने सांगितलें कीं, "लोकानी जी सर्व विनंती केली ती ऐक; कारण कीं, त्यानी तुला नाकारिलें असें नाहीं, त्यानी मला नाकारिलें, आणि मी त्यांचा राजा असावा अशी त्यांची इच्छा नाहीं."

असें होत असतां त्या वेळीं बन्यामीन वंशांतील एका कीश नांवाच्या माणसाने कांहीं गाढवें गमावलीं. तेव्हां त्याने आपला पुत्र शाऊल यास कांहीं चाकर देऊन त्यांच्या शोधार्थ पाठविलें. जेव्हां ते रामा नगरापासीं आले तेव्हां चाकरांच्या मनांत असी कल्पना आली कीं, आपण कोणत्या वाटेने जावें हें एथील शमुवेल भविष्यवादी यास विचारावें. या वेळीं ईश्वराने त्या भविष्यवेत्त्यास उघड करून सांगितलें कीं, "पाहा ज्या माणसाविषयीं मी तुला बोललों तो हाच आहे. हा माझ्या लोकांवर अधिकार करील." नंतर शमुवेल शाऊलाला ह्मणाला

कीं, "तुझीं जीं गाढवें तीन दिवसांमागें बहकलीं गेलीं, त्यां-विषयीं काळजी करूं नको कारण कीं, तीं सांपडलीं आ-हेत. अणखी इस्राएल लोकांची सर्व इच्छा कोणाकडे आहे ? तुझ्याकडे आणि तुझ्या बापाच्या घराण्याकडे आहे कीं नाहीं ?" शाऊलास हें भाषण समजलें नाहीं; परंतु दुसऱ्या प्रातःकाळीं त्या भविष्यवाद्याने त्यास बरो-बर घेऊन निवांत जागीं नेलें आणि तेलाची कुपी का-ढून त्याच्या डोकीवर ओतिली आणि त्याचें चुंबन घेऊन ह्मणाला कीं, "परमेश्वराने तुला आपल्या लोकांवर अधि-कारी होण्यास अभिषेकिला आहे कीं नाहीं?" नंतर शमु-वेलाने हें प्रसिद्ध करीपर्यंत शाऊलाने हें वर्त्तमान कोणास सांगितलें नाहीं.

नंतर लवकरच त्या भविष्यवाद्याने सर्व लोकांस एकत्र करून त्यांजपुढें त्यांचा नवा राजा बसविला. शाऊल हा सुंदर पुरूष होता आणि त्याची आकृती उंच होती. मग सर्व लोक मोठ्या शब्दाने बोलले कीं, "हा राजा चिरकाळ वाचो."

नंतर तो लकरच लढाईंत गुंतला. आणि त्याने आम्मोनी लोकांपासून गिलादास सोडविलें. आणि त्या-च्या शूरत्वामुळें सर्व लोक त्याची कृतज्ञता मानूं लागले. परंतु अमालकी लोकांचा पराभव केल्यानंतर त्याने ईश्व-राच्या आज्ञेविरूद्ध माणसें व गुरें यांचे जीव वांचविले. आणि ज्याचा त्याला नाश करायास आज्ञा मिळाली हो-ती तें यज्ञांत अर्पण करावें असा त्याने बेत केला. तेव्हां शमुवेल त्यास भेटायास येऊन ह्मणाला कीं, "परमेश्वरा-ला आपल्या वाक्याच्या मान्यतेकडून जी संतुष्टता होती

तितकी यज्ञ व अर्पण, यांकडून त्याला होती कीं काय? पाहा यज्ञापेक्षां मान्यता बरी, आणि मेंढरांच्या मासापेक्षां वाक्य ऐकणें बरें, असें आहे. कारण कीं अवज्ञा गारुडाच्या पापासारिखी आहे. आणि दुष्टाई व मूर्त्तिपूजा यासारिखा हट आहे." तेव्हांपासून शाऊल अधिकाधिक आज्ञाभंजक व असमाधानी होऊं लागला आणि परमेश्वराचा आत्मा त्यापासून लवकरच अगदी निघून गेला.

---

## गोष्ट ४३. दावीद मेंढपाळ.

शमुवेल बेथलेहेमास गरीब दाणे टिपणारीण रूथ इचा वंशज जो ईशाय त्याजवळ गेला. कारण कीं प्रभु



त्यास ह्मणाला, "मी आपल्याला यशायाच्या मुलांतून राजा निवडला आहे." यशायाने त्याला आपल्या मु-

त्याबरोबर जेवायास बोलाविलें. असें करण्याचा हेतु इतकाच कीं, आपण त्यास पाहावें व ज्याला प्रभूने निवडून काढिलें आहे त्याला गुप्तरूपें अभिषिक्त करावें. यशायाचे सात मुलगे हाजीर होते, आणि त्या सर्वांस पाहून शमुवेलाला आनंद वाटला तरी प्रत्येकाविषयीं परमेश्वराने त्याला असें सुचविलें कीं, "यास मी निवडून काढलें नाहीं." शमुवेलाने यशायास विचारिलें, तुझे इतकेच मुलगे आहेत कीं काय?" सर्वांहून जो लहान मुलगा तो राहिला होता. तो शेतांत मेंढ्यांजवळ होता, आणि त्याविषयीं कोणास आठवण झाली नाहीं. त्याला मग बोलावयास पाठविलें; तेव्हां तो आला. त्याचें तोंड तांबूस व सुंदर पाहायाजोगें होतें. आणि प्रभू बोलला, "ऊठ त्याला अभिषेक कर, कारण कीं निवडून काढलेला तो हा." मग शमुवेलाने आपलें तेलाचें सिंग घेऊन सर्व भाऊबंदासमक्ष त्याला अभिषिक्त केलें.

त्या दिवसापासून प्रभूचा आत्मा त्याच्या आंत येऊन राहिला. परंतु प्रभूचा आत्मा शाऊल याजवरून निघाला. मग शाऊलाला चैन पडेनासें झालें. जेव्हां त्याजवर दुष्ट आत्मा येई, तेव्हां कोणी सारंगी वाजवील आणि गाईल असा मनुष्य त्याला पाहिजे होता. त्याच्या एके चाकराने त्यास सांगितलें कीं, इशायाचा मुलगा फार शूर व शाहाणा मुलगा आहे, आणि त्यास सारंगी चांगली वाजवितां येती. मग दावीद यास मेंढ्यांचे कळप सोडून येण्यास बोलावूं पाठविलें. नंतर शाऊलाने त्याला आपला चिलखत बाळगणारा केला.

## गोष्ट ४४. दावीद आणि गोल्याथ.

कांहीं दिवसांनंतर जेव्हां पलिष्टी लोकांबरोबर युद्ध होऊं लागलें तेव्हां दावीद फिरून बेथलेहेमांत राहत होता; परंतु त्याचे वडील भाऊ शाऊलाच्या सैन्यांबरोबर गेले. एके दिवशीं भाऊबंदांची भेट घ्यायास बापानें दाविदाला छावणीकडे पाठविलें. तो खंदकाजवळ आला असतां त्यानें असें पाहिलें कीं, लढाईकरितां सेना सिद्ध केली आहे. पलिष्टी लोकांतून साहा हात उंच असा एक युद्धवीर मोठें चिलखत घालून इस्राएल लोकांतून मोठमोठ्या शूरांजवळ लढाई करण्याविषयीं युद्धामंत्रण करीत असे. त्यावेळेस लोकानी त्याची गोष्ट दाविदाला सांगितली. ते अणखी हें ह्मणाले, राजानें असें कबूल केलें आहे कीं जो कोणी त्या वीरास ठार मारील त्याला राजा आपली कन्या देईल, आणि त्याच्या बापाचें कुटुंब इस्राएलामध्यें नामांकित करील. त्या बक्षिसाविषयीं त्यानें परवा बाळगिली नाहीं; परंतु इस्राएली लोक ज्यांचा देवावर विश्वास होता, त्यांतून एकहि त्या पलिष्ट्याबरोबर लढाई करायास शक्य नव्हता, ह्मणून त्यास फार दुःख वाटलें. आपली इच्छा त्याबरोबर लढाई करण्याची आहे; असें त्यानें राजास सांगून पाठविलें. राजा त्यास या कामांत न पडण्याविषयीं उपदेश करून ह्मणाला, तूं मूल आहेस आणि लहानपणापासून तो योद्धा आहे. दावीद यानें ह्मटलें कीं, प्रभु ज्यानें मला सिंहाच्या आणि अस्वलाच्या पंजापासून वांचिवलें तो मला या पलिष्ट्याच्या हातून वांचवील. शा-

ऊलाने आपलें चिलखत व टोप व लोखंडी आंगरखा त्यास घालावयास दिल्हा. परंतु दाविदाने तो घातला नाहीं, आणि तरवारहि घेतली नाहीं. परंतु आपला मेंढपाळाचा पातळ आंगरखा तसाच असूं देऊन नदींतून गुळगुळीत दगड घेऊन तो आपली काठी व गोफण घेऊन त्या पलिष्ट्याबरोबर लढाई करायास गेला.

जेव्हां गोल्याथ याने या मेंढे राखणाऱ्या मुलास येतांना पाहिलें, तेव्हां तो त्यास शाप देऊं लागला. "काय मी कुत्रा आहे तर तूं काठ्या घेऊन मजकडे येत आहेस? मजकडे ये आणि मी तुझें मांस हवेंतील पांखरांस आणि रानांतील पशूंस देईन." दावीद ह्मणाला, "तूं मजकडे तरवार, भाला, ढाल इतकीं घेऊन येत आहेस; परंतु मी समुदायाचा यहोवा इस्राएलाच्या सैन्याचा देव, ज्याला त्वां निंदिलेंस, त्याच्या नावाने तुझ्याजवळ येतों." तो पलिष्टी दाविदाकडे येऊं लागला, तेव्हां दाविदाने जलदी करून त्याच्या कपाळावर एक दगड मारला तेणेंकरून तो भूईवर उपडा पडला. मग दावीद धांवून त्या पलिष्ट्याची तरवार धरून त्याचें डोकें त्याने उडविलें.

हें पाहून पलिष्टी भयाभीत होऊन पळाले आणि इस्राएली लोक त्यांच्या पाठीस ज्या शहरांत ते जात तोंपर्यंत लागले.

शाऊल दाविदास त्याच्या कुटुंबाविषयीं विचारूं लागला. दावीद बोलला, तुझा चाकर यीशाय जो बेथलेहेम गावांत राहतो, त्याचा मी मुलगा. दावीद शाऊलाबरोबर बोलत असतां, योनाथान जो राजाचा पुत्र त्याचा जीव प्रीतीने दाविदाच्या जीवासीं जडला. आपली मैत्री

दाखविण्यासाठीं त्या राजाच्या मुलाने आपली तरवार, धनुष्य आणि कंबरबंद त्या शूर मेंढपाळास दिल्हा. राजाने दाविदास परत घरीं जाऊं न देतां त्यास आपल्या लढाईच्या माणसावर नेमलें.

---

## गोष्ट ४५. दाविदाचा पाठलाग.

दावीद याची चढती फार दिवस चालली नाहीं. इस्राएली लोक पलिष्ट्यांचा पराजय करून घरीं परत येत होते तेव्हां बायका नाचत असतां गाऊं लागल्या कीं, "शाऊलाने हजारोहजार माणसांस मारिलें, दाविदाने तर दाहा दाहा हजारांस मारिलें." राजाला हें ऐकूं आलें तेव्हां त्यास वाईट वाटलें. तो ह्मणाला, त्याला राज्याशिवाय अणखी काय मिळावयास राहिलें? नंतर जसी जसी लोकांची प्रीति त्या दाविदावर बसतांनां राजा पाही, तसतसा तो त्याचा द्वेष करी. शेवटीं त्या राजाने त्यास ठार मारायाचा बेत मांडला. एके दिवसीं दावीद राजापुढें वाद्य वाजवीत असतां शाऊलाने आपला भाला त्यावर फेंकला. मग शाऊलाने दाविदास जिवें मारावयास त्याच्या घरीं दूत पाठविले. परंतु त्याची बायको मिखाल जी शाऊलाची कन्या तिने त्यास एका खिडकींतून उतरिलें. मग दाविदाने पळून जाऊन आपल्या जिवाचें रक्षण केलें.

योनाथान ज्याने पूर्वीं एक वेळ आपल्या बापास सुबोध केला होता, त्याने या वेळीं शाऊल व दावीद यांमध्यें सल्ला व्हावा ह्मणून पुष्कळ यत्न केला; परंतु तो सर्व व्यर्थ गेला.

राजा ह्मणाला मी त्याला जिवें मारण्याविषयीं निश्चय केला आहे. योनाथानाने आपली मैत्री दाविदाबरोबर चालूं करून त्यास सांगितलें कीं तूं पळून जा. त्यावर दावीद पलिष्ट्याच्या राजाकडे पळून गेला. त्याने आपल्या बरोबर गोल्याथाची तरवार घेतली होती. पण पलिष्टी सरदारानी त्याचा वहमा धरिला ह्मणून त्याला आपला जीव राखण्याविषयीं मोठी मुसकील पडली.

नंतर दावीद यहुदा देशांतील डोंगराच्या खडकांत व गुहेंत राहिला. तेथें कांहीं वेळाने साहाशें मनुष्य व त्यांसुद्धां पुष्कळ ह्मातारे मनुष्य, बायका व मुलें मिळालीं. त्यांतून बहुतेक दाविदाचे मित्र व सोयरे होते, कारण शाऊल त्यांचा त्रास करीत होता. शाऊलाने आपला सूड इतका उगवला कीं, ज्या मुख्य उपाध्याने दावीद हा राजापासून पळून आला आहे, हें न कळतां दाविदाला आकर व गोल्याथाची तरवार दिली होती, त्यास जिवें मारण्याचा हुकूम केला. अणखी त्याजबरोबर ८४ गरीब उपाध्यांसहि मारिलें परंतु एवढ्यानेहि त्याचें समाधान झालें नाहीं. अणखी असें कीं, त्या उपाध्याच्या सर्व शहराचा नाश केला, व त्यांतल्या पुष्कळ बायका व मुलें जिवें मारिलीं. त्यांतील एक असामी मात्र निष्टून दाविदाजवळ पळून गेला. या मनुष्याचें नाव अबियाथार होतें तो कांहीं दिवसानी मुख्य उपाध्या झाला.

दावीद पळून गेल्यानंतर योनाथानाने आपली मैत्री त्याबरोबर राखली होती ; आणि दावीदहि प्रीतीने व मान्यतेने शाऊल राजासींहि वर्त्तत असे. हा आपला राजा, सासरा, आणि आपल्या मैत्राचा बाप

आहे, याचा विसर दाविदाने कधींहि केला नाहीं.

उपाध्याची कत्तल झाल्यावर थोडक्या दिवसांनी शाऊल तीन हजार मनुष्य सहवर्त्तमान दाविदास धरावयास यहूदा देशाच्या डोंगरांवर गेला. तेथें असें घडलें कीं, शाऊल विसावा घेण्याकरितां गुहेंत जाऊन निजला. दावीद तर आपल्या मनुष्यांसुद्धां त्याच गुहेच्या आंतील बाजूस लपून राहिला होता. जेव्हां शाऊलास निज लागली, तेव्हां दाविदाचीं मनुष्यें त्यास ह्मणूं लागलीं कीं, "प्रभूने तुला जसें सांगितलें कीं, मी तुझा शत्रू तुझ्या हातीं देईन, त्याप्रमाणें आतां झालें पाहा बरें." मग दाविदाने उठून शाऊलाच्या वस्त्राचा कांठ गुप्तरूपें कापून घेतला. मग आपण असें केलें ह्मणून दाविदाचें मन खाऊं लागलें, आणि तो आपल्या मनुष्यास ह्मणाला, माझा जो धनी ज्याला प्रभूने अभिषिक्त केलें त्यावर माझा हात न पडो. दाविदाने आपल्या चाकराकडून शाऊल यास इजा देऊं दिल्ही नाहीं. मग शाऊल उठून त्या गुहेंतून चालता झाला. नंतर दाविदहि उठून गुहेबाहेर येऊन ह्मणूं लागला "हे माझ्या प्रभू राजा, आज परमेश्वराने तुला कसें या गुहेंत माझ्या हातांत आणलें होतें तें पाहा. कितीएकाने तुला जिवें मारावें असें मला सांगितलें, तेव्हां मी बोललों कीं, मी आपला हात माझ्या प्रभूवर उचलणार नाहीं. कारण कीं तो प्रभू देवाचा अभिषिक्त आहे. अणखी पाहा कीं, तुझा वस्त्रकांठ माझ्या हातीं आहे." मग शाऊल रडून ह्मणाला कीं, "माझ्यापेक्षां तूं फार सत्कर्मी आहेस." मग तो आपल्या कर्माविषयीं लज्जित होऊन घरीं गेला.

११॥

परंतु थोडे दिवस गेल्यानंतर तो पुनः दाविदाबरोबर लढाई करण्याकरितां गेला. हाकिला या टेंकडीवर त्याने मुक्काम केला. मग दावीद व अबीशा रात्रीं राजाच्या छावणींत गेले. तेथें शाऊल हा गाड्यांच्या गराड्यांमध्यें निजला होता आणि त्याचा भाला त्याच्या उशीजवळ भूमींत रोंवलेला होता आणि त्याच्या सभोंवतीं आबनेर व लोक निजले होते. तेव्हां अबीशा दाविदास ह्मणाला, "देवाने तुझा शत्रू तुझ्या हातीं आज दिल्हा आहे. तर आतां मला त्यास भाल्याने ठार मारूं दे." परंतु दावीद अबीशास ह्मणाला, "त्याला वधूं नको. कां कीं दोषी झाल्यावांचून आपला हात परमेश्वराच्या अभिषिक्तावर कोण टाकील!" मग दाविदाने जो भाला व पाण्याचा चंबू शाऊलाच्या उशीपासीं होता तो घेऊन पलिकडे जाऊन त्या डोंगराच्या शिखरावर उभा राहिला, आणि आपल्या व त्यांच्यामध्यें मोठें अंतर असतां त्याने लोकांस व आबनेर यास हाक मारिली. हे आबनेरा! हे आबनेरा! तेव्हां शाऊलाच्या सरदाराने जागे होऊन उत्तर केलें, राजाला हाक मारणारा असा तूं कोण आहेस? मग दाविदाने उत्तर केलें कीं, तूं वीर नाहींस काय? आणि इस्राएलामध्यें तुजसारिखा कोण आहे? त्वां तुझा राजा जो प्रभू त्याला कां राखिलें नाहींस? कां कीं राजा जो तुझा प्रभु त्याचा घात करायास लोकांतील कोणीएक आला होता. तर आतां राजाचा भाला व जो पाण्याचा चंबू त्याच्या उशीपासीं होता, तोहि कोठें आहे? त्याचा शोध कर." तेव्हां शाऊलाने दाविदाचा शब्द ओळखला आणि ह्मटलें कीं, "हे माझ्या पुत्रा दाविदा,

हा तुझा शब्द आहे कीं काय?" मग दावीद ह्मणाला, "हे महाराज माझ्या प्रभु, हा माझा शब्द आहे. अणखी तो ह्मणाला, हे महाराज तूं आपल्या चाकराच्या पाठीस कां लागला आहेस? म्या काय केलें आहे? आणि माझ्या पदरीं काय अन्याय आहे? इस्राएलाचा राजा, जसा कोणी डोंगरावरच्या तितराची शिकार करायास येतो, तसा हा पिसुचा शोध करायास आला आहे." तेव्हां शाऊल ह्मणाला, "म्या पातक केलें आहे, हे माझ्या पुत्रा दाविदा, माघारें ये; माझा जीव आज तुझ्या दृष्टींत मोल्यवान आहे; ह्मणून मी तुझें अणखी वाईट करणार नाहीं." परंतु दाविदाला ठाऊक होतें कीं, रागीट मनुष्याच्या बोलण्याचा विश्वास धरूं नये. तो ह्मणाला, "राजाचा भाला पाहा, चाकरांतील कोणीएकाने इकडे येऊन द्यावा." मग दावीद तेथून निघून गेला आणि शाऊल आपल्या ठिकाणीं परत आला. दावीद आणि शाऊल यांची ही शेवटची भेट झाली. शाऊल त्यानंतर फार दिवस वांचला नाहीं.

---

## गोष्ट ४६. शाऊलाचा मृत्यु. दावीद राजा झाला.

दावीद मग आपल्या साहाशे माणसांसुद्धां पलिष्टी देशांत शरण गेला; कारण त्याला धास्ती होती कीं, आपण कधीं तरी शाऊलाच्या हातीं सांपडूं. गाथाचा राजा अखीष याने दाविदास जिकलाग ह्मणून एक शहर दिल्हें. त्या शहरांत तो आपल्या बायका मुलांसुद्धां दीड वर्ष राहिला. आणि त्या वेळीं असें झालें कीं

पलिष्ट्यानी आपली सेना इस्त्राएल लोकांस लढाई करावयास एकत्र केली. तेव्हां अखिषाने दाविदास ह्मटलें कीं, "तूं माझ्या संगतीं निश्चयें लढाईस यावें." मग दावीद अखिषाबरोबर गेला. परंतु पलिष्ट्याचे सर्दार दाविदास भिऊं लागले, ह्मणून दाविदाला परत घरीं यावें लागलें. जेव्हां तिसऱ्या दिवशीं दावीद जिकलागास आला, तेव्हां अग्नीने नाश झाला आहे असें त्याच्या दृष्टीस पडलें. अमालेक्यानीं त्या शहराचा नाश केला, आणि त्यांत ज्या बायका, मुलें, व त्याचें सामान होतें, तेंहि नेलें. दाविदाचीं माणसें चालण्याने जरी थकलीं होतीं, तरी तीं रानांतून सर्व रात्रभर त्या चोराच्या पाठीमागें लागत गेलीं, आणि दुसऱ्या दिवशीं सूर्य उगवण्याच्या पूर्वीं त्यांना गांठलें. तेव्हां ते लोक भूमीवर पसरून इकडे तिकडे खातात पितात व नाचतात असें पाहिलें; कारण त्यानी पलिष्टी व यहूदी यांच्या प्रांतांतून पुष्कळ लूट घेतली होती. दावीद त्यास मारीत गेला आणि त्याने जें सर्व नेलें होतें तें माघारें घेऊन अणखी त्याच्याजवळून पुष्कळ लूट घेतली.

इतक्यांत गिलबोह डोंगरावर काय चाललें होतें, तें पाहा! पलिष्ट्यानी इस्त्राएली लोकांचा पराजय केला. शाऊलाचा योनाथान व दुसरे दोन पुत्र त्या लढाईंत पडले. शाऊलाने आपल्या तरवारीवर पडून आपला जीव घेतला. अमालेकी लोकांची कत्तल करून दावीद जिकलाग एथें आला नाहीं इतक्यांत एक अमालेकी माणसाने येऊन शाऊलाच्या पराजयाची व मृत्यूची बातमी सांगितली. तो माणूस जेथें लढाईमध्यें मेलेले पडले होते

तेथें गेला होता व तेथें शाऊलाचें प्रेत त्याच्या दृष्टीस पडलें. तेव्हां राजाच्या झग्याचा कांहीं भाग व डोक्यावरला मुगुट घेऊन तो दाविदापासीं आला व आपण त्या राजास मारलें, असें बोलला. कारण त्याला आशा होती कीं, आपणास मोठें बक्षिस मिळेल. परंतु दावीद आपलीं वस्त्रें दुःखानें फाडून त्या माणसास ह्मणाला "प्रभूच्या अभिषिक्ताचा वध करण्यास तुला भय कसें वाटलें नाहीं ? तुझें रक्त तुझ्या डोक्यावर असो; कां कीं तूं आपल्या अपराधाविषयीं कबूल झाला आहेस." दाविदानें त्यास जिवें मारण्याचा हुकूम केला.

दावीद आपल्या मनुष्यांसहवर्त्तमान आपल्या देशास आला, आणि हिब्रोन एथें उतरला. अमालेकी लोकांजवळून जी लूट मिळाली होती त्यांतून कांहीं भेट यहुदादेशांतील मोठ्या गृहस्थांस पाठविली. इस्राएल लोकानी दाविदास आपला राजा केला. परंतु आब्नेर यानें इषबोशेथ जो शाऊलाचा पुत्र हा राजा केला. त्या वेळीं लोकांवर दोन राजे होते. परंतु हे फार दिवस चालले नाहीं ; साहा वर्षांनंतर इषबोशेथ याला त्याच्या चाकरानी ठार मारिलें. मग दावीद सर्व इस्राएल लोकांवर राजा झाला.

---

## गोष्ट ४७. ऊरियाच्या वधाविषयीं.

हा मेंढपाळ मुलगा आतां राजा झाला; परंतु त्यामुळें तो आपली सारंगी विसरला नाहीं. आणि या रा-

जपुरुषाने जीं स्तोत्रें लिहिलीं, तीं अद्यापी जे उल्हासी आहेत त्यांस आनंदकारक आहेत व जे दुःखी आहेत त्यांस समाधान देतात.

यरूशालेम नगर परत जिंकून घेणें हें दाविदाला अवश्य होतें; कारण कीं यबुसी लोकांनी तें हस्तगत करून घेतलें होतें. दाविदाने तें हल्ला करून घेतलें आणि यरूशालेम फार मोठें व सुंदर करून तें आपल्या देशाचें मुख्य शहर केलें.

दाविदाने पुष्कळ लढाया केल्या आणि आपल्या राज्याच्या मर्यादा पश्चिमेस भूमध्यसमुद्रपर्यंत, पूर्वेस यूफ्रात नदीपर्यंत, आणि उत्तरेस दमास्कस शहरापर्यंत व तेथून खालीं दक्षिणेस मिसर देशापर्यंत, अशा वाढविल्या आणि इतक्या लढाया होत असतांहि त्याच्या राज्यांत लोक पूर्वींपेक्षां फार सुखी होते. आणि त्याने जे आरामी एदोमी मोआबी व पलिष्टी लोक जिंकिले, त्यांनीहि त्याच्या राज्यांत आपणास सुखीच असें मानिलें असेल.

या वेळीं दावीद राजाने ऊरीया या नावाच्या आपल्या लष्करांतील एका शूर सरदाराची स्त्री बेथशीबा इजबरोबर जारकर्म केलें आणि याकरितां ऊरीया हा शत्रूपासून मारला जावा ह्मणून त्यास लढाईंत तोंडीं नेमण्याचा हुकूम आपला सरदार जो आब्नेर यास दिल्हा. शाऊलाने आपणास मारण्याकरितां एकवेळ असीच मसलत केली होती; पण देवाने ती सिद्धीस जाऊं दिली नाहीं, याची दाविदास आठवण राहिली नाहीं, कारण कामविकाराने तो आंधळा झाला होता. मग हुकूम केल्याप्रमाणें ऊरीयाचा वध झाला आहे. आणि नंतर

एक वर्षभर दावीद आपल्या कर्माचा पश्चात्ताप न करितां तसाच राहिला.

नंतर ईश्वराने त्याजकडे नाथान नामें भविष्यवादी पाठविला, आणि तो ह्यास ह्मणाला कीं, "एका शहरामध्यें दोन मनुष्यें होतीं, त्यांतून एक मातबर व दुसरा गरीब होता. द्रव्यवान माणसाजवळ गुरें, ढोरें व बकरीं, यांचीं पुष्कळ खिल्लारें व कळप होते. परंतु गरीब माणसाजवळ एका लहान मेंढीशिवाय दुसरें कांहीं नव्हतें. ती त्याने विकत घेऊन पाळून लेंकरासारिखी वाढविली होती. ती त्याच्या ताटांतून खात असे व त्याच्या प्याल्यांतून पीत असे, आणि त्याच्या उरासीं निजत असे; आणि ती त्यास कन्येप्रमाणें होती. पुढें असें झालें कीं त्या मातबर गृहस्थाच्या घरीं कोणी एक वाटसरू आला तेव्हां त्यास मेजवानी करण्याकरितां त्याने आपल्या कळपांतून कांहीं न घेतां त्या गरीब मनुष्याची मेंढी मारून आपल्या पाहुण्यास जेवण केलें."

ही गोष्ट ऐकून दावीद समजला कीं, याविषयीं आपण न्याय करावा, असें नाथान विचारित असेल ह्मणून तो मोठ्या रागाने ओरडून ह्मणाला कीं, "ईश्वर आहे ह्मणून तो मनुष्य खरोखर नाश पावेल; व त्याने त्या गरीब मनुष्यास त्याच्या चौपट मेंढ्या द्याव्या. कारण त्याने हें निर्दय काम केलें आहे ह्मणून."

नंतर नाथान दाविदास ह्मणाला कीं "तो मनुष्य तूंच आहेस. इस्राएल लोकांचा प्रभु जो देव तो असें ह्मणतो कीं, मी तुला इस्राएल लोकांवर राजा केला आणि मी तुला शाऊलाच्या हातांतून सोडविलें. तर तूं प्रभू-

च्या समोर पाप करण्यास त्याच्या आज्ञेचा धिक्कार कां केलास? ऊरीया जो हित्ती यास तूं तरवारीने शत्रूकडून मारिलेंस आणि त्याची बायको तूं आपणास घेतलीस." तेव्हां दाविदास आपल्या पापाविषयीं समज आला. त्याचें अंतःकरण जागें झालें, आणि अनुताप करून तो असें कबूल झाला कीं, "मी ईश्वराविरूद्ध पाप केलें." नंतर नाथानाने त्यास असें सांगितलें कीं, "ईश्वराने तुझ्या पापाची क्षमा केली आहे; परंतु तुला व तुझ्या कुटुंबाला त्याचें फळ प्राप्त होईल. परमेश्वर तुझ्या घरांतून तुजवर अरिष्ट आणील, तेणेंकरून तूं मरणार नाहींस, तथापि या कर्मावरून प्रभूच्या शत्रूंस दुर्भाषण बोलण्यास तूं मोठें कारण केलें आहेस, ह्मणून जें मूल तुला झालें आहे, तें खचित मरेल."

यावरून आपण असें शिकावें कीं पवित्र आणि न्यायी जो देव तो आपल्या लोकांत पापकर्माविषयीं शिक्षा केल्याशिवाय राहाणार नाहीं. जे त्याजवर विश्वास ठेवितात व त्याची प्रीति करितात, त्यांस तो आपल्या आज्ञा पवित्रपणाने पाळायास सांगतो. आणि जे खरे विश्वासू आहेत त्यांचें मळीण झालेलें अंतःकरण शुद्ध करण्यास व पवित्रपणाची प्रीति व पापाचा द्वेष, हीं त्यांच्या आत्म्यांत ठसवायास तो कृपा करून आपला पवित्र आत्मा देतो. परंतु हें न मानितां जर ते खऱ्या ज्ञानाच्या व समाधानाच्या वाटेबाहेर जातील आणि पापांत पडतील तर त्यांस पुनः पश्चात्ताप होण्याकरितां तो बहुधा कठीण उपाय करितो, आणि त्यांच्या अपराधाच्या वाईट परिणामाने त्यांचें जीवित्व क्लेशदायक करितो. आपल्या बेकैद वासनामुळें

आपलें मुलगें मेलें पाहिजे, हें ऐकणें बापास मोठें दुःख होय. आपल्या मुलाचा प्राण वांचवावा ह्मणून ईश्वराची प्रार्थना करीत दावीद सात दिवसपर्यंत उपास व शोक करीत भूमीवर पडला होता. दाविदाने त्यावेळीं केलेलें असें एक गीत शास्त्रांत आहे, तें याप्रमाणें: "हे परमेश्वरा तुझ्या प्रीतियुक्त दयेस्तव मजवर दया कर. तुझ्या अनंत कृपेस्तव माझे अपराध पुसून टाक. माझ्या दोषापासून मला अगदी धुऊन टाक व माझ्या पापापासून मला शुद्ध कर. कां कीं मी आपले दोष पदरीं घेतों, व माझें पाप निरंतर मजपुढें आहे. तुजविरुद्ध, हे ईश्वरा, केवळ तुझ्याच विरुद्ध म्या पाप केलें आहे. मजमध्यें पवित्र अंतःकरण उत्पन्न कर आणि मला नवा सत्यात्मा दे."

परंतु जेव्हां तें लेंकरूं मरण पावलें, तेव्हां तो भूमीवरून उठला व अंघूळ करून त्याने तैलाभ्यंग केलें आणि आपलीं वस्त्रें बदलून तोंडाने ईश्वराची स्तुती करीत व आभार मानीत त्याच्या मंदिरांत गेला.

त्याने केलेलें दुसरें एक स्तोत्र तें याप्रमाणें, "हे माझ्या जिवा, ईश्वराचें सुवंदन कर, माझ्या सर्व अंतर्यामा, त्याचें पवित्र नाम सुवंदित ह्मण. हे माझ्या जिवा, ईश्वराचें सुवंदन आणि त्याचे सर्व उपकार विसरूं नको. तो तुझे सर्व अन्याय क्षमा करितो, व तुझे सर्व रोग बरे करितो. तो तुझें आयुष्य नाशांतून उद्धरितो व तुजला दयाकरुणानी मुकुटमंडित करितो. मनुष्य कसा! त्याचें आयुष्य तृणासारिखें आहे. जसें रानांतलें फूल तसा तो फुलतो; वारा त्याजवर जातो तेव्हां तें नाहींसें होतें आणि त्याचें ठिकाण ह्याला पुनः ओळख-

णार नाहीं. परंतु ईश्वराची दया अनादि कालापासून अनंत कालापर्यंत त्याच्या भक्तांवर आहे. आणि त्याचें सात्विकपण लेंकरांच्या लेंकरांवर आहे. जे त्याची संधा पाळितात, व त्याच्या आज्ञा आचरायासाठीं जे स्मरतात त्यांजवळ तो आहे.

---

## गोष्ट ४८. आबसालोम.

दाविदाच्या लहान मुलाचें मरण हें केवळ त्याच्या दु:खास मुळारंभ मात्र झालें. जसें नाथानाने भविष्य केलें होतें, त्याप्रमाणें अति वाईट गोष्टी एकामागून एक झाल्या. दाविदाच्या पुत्रांतून आबसालोम या नावाच्या एकाने आपला भाऊ आमनोन यास मारिलें, ह्मणून त्यास दाविदाचा मोठा क्रोध सोसावा लागला. मग त्याने आपल्या बापास गादीवरून उठविण्याची मसलत केली. ही मसलत मोठ्या हिकमतीने योजिली होती. आहितोफेल या नावाचा जो दाविदाचा मुख्य मंत्री तो यास वश झाला होता; व बहुतेक लोक याजकडेसच होते. त्याचें सौंदर्य सर्व इस्राएल लोकांत उत्कृष्ट होतें तेणेंकरून त्यास पूर्वीच पुष्कळ अनुकूल होते, आणि त्याने आपल्या कावेबाजीने अणखी पुष्कळांचीं मनें आपल्याकडेस वळविलीं होतीं.

आबसालोम यास हेब्रोन गावीं राजा केला, असी वातमी एका दिवसीं यरूशालेमांत अकस्मात येऊन पोहंचली. ती ऐकतांच दावीद धैर्य सोडून ह्मणाला, “चला आपण पळून जाऊं, नाहीं तर आपण आबसालोमाच्या हातांतून वांचणार नाहीं.” असें ह्मणून दावीद राजा

शहराबाहेर निघून केद्रान नावें ओहळ यावरून आलि-वेट डोंगराच्या चढणीवर गेला. आणि वाटेंत आपलें तोंड झांकून रडत चालत असे. आणि जे सर्व लोक त्याजबरोबर होते ते सगळे आपापलें डोकें आच्छादून रडत चालले. ते जात असतां शाऊलाचा कोणीएक शिमही नावाचा सोयरा दाविदावर धोंडे टाकून त्यास श्राप देऊं लागला. तें पाहून आबिषाई जो दाविदाचा भाचा त्याच्या मनांत आलें कीं आपण जाऊन त्याचें शीर तोडावें; पण दावीद ह्मणाला कीं "त्यास श्राप देऊं दे. कारण देवानेच त्याला दाविदास श्रापायास सांगितलें आहे, ह्मणून त्याचा निषेध कोणी करूं नये." नंतर दावीद महानाईम या नावाच्या किल्यांत गेला. इतक्यांत आबसालोम याने यरूशालेमांत येऊन राजाची गादी हस्तगत करून घेतली. आणि तो असें समजला कीं आपण आतां निर्भय आहों व आपल्या बापास जिवंत किंवा मेलेला असा स्वाधीन करून घेण्याकरितां इस्राएलास हुकूम मात्र देणें राहिलें आहे. परंतु राज्यामध्यें जे इमानी होते ते दाविदाच्या भोंवतें लवकरच मिळाले आणि त्या बंडखोर पुत्रावर जाण्यास लढाईस उभे राहिले. त्यांचा सेनापति योआब होता. ते त्या वृद्ध राजास आपल्या बरोबर बाहेर येऊं देईनात; ते त्यास ह्मणाले कीं, "आह्मा दाहा हजारांच्या योग्यतेचा आहेस ह्मणून तूं गांवांतून आह्मास पुस्ती करावीस, हें फार चांगलें आहे." जेव्हां ते बाहेर गेले तेव्हां दाविदाने सरदार लोकांस बजावून हुकूम दिल्हा कीं, "मजकरितां माझ्या तरूण आबसालोमाबरोबर तुह्मी संतपणाने वागा."

नंतर त्या बंडखोराच्या लष्कराचा अगदीं मोड झाला आणि आबसालोम पळत असतां वाटेंत त्याचे सुंदर लांब केश ओक झाडाच्या फांदीमध्यें अडकून तो त्या झाडास लोंबत राहिला. आणि ज्या खेंचरावर तो बसला होता,



तें त्याच्या खालून निघून गेलें. अशा अवस्थेंत त्यास एका शिपायाने पाहून त्याने तें मुख्य सरदारास सांगितलें. तेव्हां योआब त्यास ह्मणाला कीं, "तूं त्यास तेथेंच्च मारून भूमीवर कां पाडिलें नाहींस? मी तुला रुप्याचें दाहा शेकल व एक कमरबंद दिल्हा असता." त्यास तो शिपाई उत्तर देऊन ह्मणाला कीं, "जरी मला रुप्याचे एक हजार शेकल मिळाले, तरी मी राजाच्या पुत्रावर आपला हात टाकणार नाहीं. कां कीं, संभाळा, माझ्या पुत्रास कोणीं हात लावूं नका, असें राजाने तुला व अबिषाई व इत्ताई, यांस बजावून सांगितलें आहे; व तें आह्मी आपल्या कानीं ऐकिलें आहे." हें ऐकून योआब ह्मणाला कीं, "मला तुजपाशीं असा उशीर करायाचा

नाहीं," असें ह्मणून त्याने तीन बरच्या घेऊन आबसालोम जो झाडाच्या फांद्यांत अडकलेला जिवंत होता, त्याच्या उरांत भोंसकल्या.

याप्रमाणें त्या बेहुकमी पुत्रास दुःखकारक मरण प्राप्त झालें. आणि जे कोणी ईश्वराचा आज्ञाभंग करून आपल्या आईबापांचा अपमान करितात, त्यांचा असाच किंवा दुसऱ्या कोणत्याहि दुःखकारक रीतीने शेवट होईल. पहिल्यापासूनच आईबापांचा अपमान करण्याविषयीं सावध असावें; कां कीं त्याचा परिणाम काय होईल हें कोणाच्याने सांगवेल?

या जयाचें वर्तमान राजास समजतांच त्यास प्रथम आनंद वाटला नाहीं; कारण त्या लढाईंत त्याचा मुलगा मेला. तो रडला आणि वारंवार आक्रंदून ह्मणाला कीं, "हे माझ्या पुत्रा! माझ्या पुत्रा आबसलोमा! तुजबद्दल मी मेलों असतों, तर बरें असतें." जरी राजाची अवस्था या प्रकारची झाली होती, तरीं जयाची बातमी यरूशालेमांत समजतांच जिकडे तिकडे फेरफार झाला. दाविदास समारंभाने शहरामध्यें परत नेण्याकरितां यहूदी लोक मोठ्या आनंदाने आले. शिमही जो दाविदास धोंडे मारीत होता, तोहि नमून क्षमा मागत आला. याप्रमाणें सर्व आनंदभरित मिळूनसुद्धां दावीद यरूशालेम नगरांत पुनः परत गेला. आणि जोंपर्यंत दावीद जिवंत होता तोंपर्यंत इस्राएलाचें एक पराक्रमी राज्य होतें.

---

## गोष्ट. ४९. इस्राएल लोकांत माहामारीचा उपद्रव.

आबसालोमाच्या मरणामुळें दंगा अगदी मोडला

नव्हता. बन्यामिनाच्या वंशांतील शेबा नावाच्या एका माणसाने प्रथम करणा वाजवून ह्मटलें कीं, "दाविदाबरोबर आह्मास भाग नाहीं, किंवा यिशायाच्या पुत्रासीं आमचा वारसा नाहीं. परंतु योआबाने त्यास लवकर जिंकलें. नंतर पुनः दाविदाच्या घराण्यांत बंड उठलें. दाविदाचा मुलगा आदोनिया यास त्याच्या बापाच्या गादीवर बसवावें, असें योआब इच्छूं लागला. परंतु दाविदाने तावडतोब बंदोबस्त करून तो बेत सिद्धीस जाऊं दिल्हा नाहीं आणि आपल्या कनिष्ठ पुत्रांतून एक जो शलोमोन त्यास सिंव्हासनावर बसविलें. परंतु हा राज्य करूं लागण्यापूर्वीं एक भयंकर विघ्न प्राप्त झालें.

आपल्या राज्यांत वारंवार दंगे व बंडें उत्पन्न होतात ह्मणून मोठीं सैन्यें नेमून देशचा बंदोबस्त करावा, असें दाविदाच्या मनांत होतें; परंतु हें कृत्य मोशेच्या नेमशास्त्रास अगदीं विरुद्ध होतें. तथापि याकरितां लोकांची गणती करण्यास त्याने आपला सरदार योआब यास सांगितलें. परंतु त्याने ही गोष्ट करावी, हें ठिक नाहीं, असें राजास योग्य रीतीने समजावून सांगितलें; तथापि राजापुढें त्याचें कांहीं चाललें नाहीं. आणि योआब व दुसरे सरदार हे सर्व कुळांतल्या लोकांची गणना करण्याकरितां नऊ दाहा महिनेपर्यंत कामास लावले होते. परंतु जेव्हां योआबाने सर्वांची संख्या दाविदाजवळ आणून दाखविली, तेव्हां त्याचें मन त्यास खाऊं लागलें व ज्या कामास त्याने हात घातला होता, त्याचा त्यास पश्चात्ताप झाला. नंतर देवाने त्याजकडे गाद या नावाचा एक भविष्यवक्ता पाठविला. तो त्यास ह्म-

णाला कीं, "देवाच्या नावाने मी तुला तीन गोष्टी देतों. त्यांतून तुला जी पाहिजे, ती तूं निवड; ह्मणजे तसें मी करितों. तुझ्या देशांत दुष्काळाचीं सात वर्षे यावीं कीं काय? किंवा तुझे शत्रू तुझा पाठलाग करीत असतां तूं त्यांच्यापुढें तीन महिने पळावें कीं काय? अथवा तुझ्या राज्यांत तीन दिवस जरीमरी असावी?" हें ऐकून दावीद ह्मणाला कीं, "मी मोठ्या संकटांत आहें. आतां आपण देवाच्या हातांत पडूं या. कां कीं त्याची दया अपार आहे. याजकरितां मला मनुष्याच्या हातांत पडूं देऊं नको." नंतर देवाने इस्राएल लोकांवर जरीमरी पाठविली. तेणेकरून डानपासून बीरशेबापर्यंत प्रांतांतील सत्तर हजार मनुष्यें मरण पावलीं. परंतु जेव्हां यरूशालेमाचा नाश करण्याकरितां देवदूताने हात पसरला, तेव्हां देवास त्या अनर्थाचा अनुताप झाला, आणि जो दूत लोकांचा नाश करीत होता, त्यास ह्मणाला कीं, "आतां पुरे कर आणि आपला हात आटोप." तेव्हां तो प्रभूचा दूत अरावना जो येबुसी त्याच्या खळ्याजवळ होता; तेथें दाविदाने जाऊन देवाकरितां यज्ञवेदी बांधून तेथें यज्ञ व शांतिकारक अर्पणें केलीं.

दाविदाने मोशेच्या नियमशास्त्राप्रमाणें लोकांमध्यें देवाची सेवा करण्यासाठीं लेवी वंशांतून साहा हजार अधिकारी नेमिले. बाकीचे जे लेवी होते त्यांची देवळाच्या सेवेचाकरीकडे नेमणूक केली. आणि आसाफाच्या संततींतून देवळाकरितां चार हजार गायकगण नेमिले, व त्यांचे चोवीस वर्ग केले होते, आणि त्यांजवर मुख्य अधिकारी केले. याशिवाय अणखी दाविदाने

पुष्कळ स्तोत्रें व गीतें रचिलीं. तीं लिहिण्यांत ईश्वराचा पवित्र आत्मा त्यास प्रेरक होता. या गीतामध्यें ख्रीस्ताने जो तारणोपाय केला, त्याच्या गोष्टी विस्तारेंकरून लिहिल्या आहेत. त्या तारणोपायाविषयीं देवाचे लोक प्रारंभापासून अपेक्षा करीत होते. तारणाऱ्याचें या पृथ्वींत येणें (१), त्याचा जन्मवृत्तांत (२), त्याचें मरण (३), पुनरुत्थान (४), स्वर्गारोहण (५), आणि तेथें त्याची मध्यस्थी (६), या सर्व गोष्टी व त्या तारणाऱ्याची तीन प्रकारची पदवी, ह्मणजे भविष्यवादी, याजक, आणि राजा (७), देवाच्या लोकांबराबर त्याची ऐक्यता (८), आणि त्याजकडून त्यांचें कल्याण होणें (९), विधर्मी लोकांस बोलावणें (१०), देवाच्या मंडळीचा पुढील गौरव (११), आणि जे सर्व तारले जातील, त्यांचें अक्षय कल्याण (१२), इत्यादिक सर्व गोष्टी येशू ख्रीस्तासंबंधीं आणि त्याने मनुष्याच्या पापाकरितां प्रायश्चित्त केलें त्यासंबंधीं सर्व त्यांत विस्ताराने लिहिल्या आहेत.

दावीद ज्या वेळीं सिंव्हासनारूढ झाला, त्यावेळीं त्याने प्रथम देवाच्या घराच्या सेवाचाकरीचा बंदोबस्त करण्याची काळजी वाळगली होती. त्याचप्रमाणें त्याचा अंतकाळ आला तेव्हां त्याने त्या अगत्याच्या गोष्टींविषयीं आपलें मन लाविलें होतें. दाविदाने आपल्या राज्यांतील सर्व सरदार व प्रजेंतील सर्व मुख्य मानकरी, यांच्या समक्ष आपला पुत्र शलोमोन याच्या हातीं राज्यकारभार दिल्हा, आणि आपल्या मनांत जें इच्छिलें होतें, तें परमेश्वराचें घर बांधण्याकरितां सांगितलें. त्याने जें पुष्कळ सोनें, रूपें, पितळ, लोखंड, त्या कामाकरितां जम-

विलें होतें, तें त्याच्या स्वाधीन केलें. आणि त्याशिवाय अणखी त्याने सोन्या रूप्याचीं पुष्कळ भांडीं करविलीं होतीं, तीं व तासलेलीं लांकडें व चिरे बहुत होते, ते सर्व त्याने त्यास दिल्हे.

---

## गोष्ट ५०. शलोमोन राजा.

शलोमोन हा आपल्या वेळच्या सर्व राजांपेक्षां मोठा धनवान होता. त्याच्या राज्यांत लोक शांत व सुखी होते. प्रत्येक मनुष्य आपल्या द्राक्षमंडपाखालीं व आपल्या अंजिराच्या झाडाखालीं निर्भयपणाने राहत असे; परंतु त्याच्या दौलतीपेक्षां त्याचें ज्ञान फार प्रख्यात असे. तो गादीवर बसल्यावर लवकरच देवाने त्यास स्वप्नांत दर्शन देऊन ह्मटलें कीं, "मी तुला काय देऊं? तूं माग." तेव्हां शलोमोनाने ह्मटलें, "त्वां आपल्या चाकरावर मोठी दया केली, आणि माझा बाप दावीद, याच्या ठिकाणीं त्वां आपल्या चाकरास राजा केलें. तथापि मी लहान मुलगा आहें. मला जाणें येणें समजत नाहीं. आणि तुझा लोक, ज्यास त्वां निवडिलेंस त्यामध्यें तुझा चाकर आहे. तो असा मोठा लोक कीं, पुष्कळपणावरून त्याची संख्या मोजून करितां येत नाहीं याकरितां त्वां आपल्या चाकराला तुझ्या लोकांचें ऐकून न्याय करायाला बुद्धि द्यावी. कीं मी बरें वाईट यांचा भेद जाणावा; कारण कीं तुझ्या मोठ्या लोकाचा न्याय करायास कोण शक्तिमान आहे?" तेव्हां शलोमोनाने तसें मागणें मागितलें ह्मणून ती गोष्ट प्रभूला आवडली. आणि देव त्यास ह्मणाला, "त्वां आपणास बहुत आयुष्य मागितलें नाहींस, आणि आपल्यासाठीं संपत्ती मागितली

नाहींस आणि आपल्या शत्रूचा प्राण मागितला नाहींस; परंतु वाद ऐकून न्याय करावयाचें ज्ञान आपल्यासाठीं मागितलेंस, यावरून पाहा म्या तुझ्या सांगण्याप्रमाणें केलें आहे. पाहा, तुला मी कुशळ व ज्ञानी, असें मन दिल्हें आहे, कीं तुझ्यासारिखा तुझ्यापूर्वीं कोणी झाला नाहीं आणि तुझ्यामागें तुझ्यासारिखा कोणी उठणार नाहीं. अणखी जें त्वां मागितलें नाहीं, ह्मणजे संपत्ती व गौरव, हींहि म्या तुला दिल्हीं आहेत, असें कीं तुझ्या सर्व दिवसांत राजामध्यें तुझ्यासारिखा कोणी होणार नाहीं. आणि जसा तुझा बाप दावीद चालला, तसा जर तूं माझे नेम व माझ्या आज्ञा पाळून माझ्या मार्गांमध्यें चालसील, तर मी तुझे आयुष्याचे दिवस वाढवीन." जरीं हें सर्व स्वप्नरूप होतें, तरीं शेवटीं तें स्वप्न ईश्वरापासून होतें, असें समजलें. आजपर्यंत जे राजे झाले, त्यापेक्षां शलोमोन राजा आपलें ज्ञान, द्रव्य आणि गौरव याविषयीं अत्यंत प्रख्यात होता. लाल समुद्राच्या मार्गाने त्याचीं तारवें हिंदुस्थानास येत. त्यास पाहावयास व त्याचें ज्ञान ऐकायास दूर देशाहून राजे येत. त्याने लिहिलेलीं दृष्टांतिक वाक्यें इतकीं वास्तविक व रसभरीत आहेत कीं तीं अद्याप अज्ञान्याच्या बोधार्थ व ज्ञान्यास परमार्थ बुद्धि देण्यास उपयोगी पडतात.

आपल्या बापाच्या आज्ञेप्रमाणें शलोमोनाने यरूशालेमांत देऊळ बांधिलें. तें देऊळ इतकें भव्य व शोभायमान होतें कीं, त्याजबराबर तुळणा करण्यास पृथ्वींत दुसरें कोणतेंहि देऊळ नव्हतें. शलोमोन व त्याची प्रजा, यानी देवाच्या सेवेंत जी तत्परता व आस्था दाख-

विली, त्याविषयीं ईश्वराने प्रत्यक्ष प्रगटून आपली मान्यता दाखविली. परंतु या पृथ्वींतील ज्या अतिशय सुंदर इमारती आहेत ईश्वराचा गौरव व मोठेपण पाहिलें असतां त्या किती हलक्या दिसतात. असें समजून शलोमोन वास्तविक नम्रतेने हे पुढील शब्द बोलला: " परंतु पृथ्वीच्या मनुष्याबरोबर देव राहील कीं काय? पाहा, आकाश आणि आकाशाचें आकाश देखील तुला पुरत नाहीं, तर जें घर मी बांधिलें आहे, तें कसें पुरेल!

शलोमोन जरीं मोठा ज्ञानी होता, तरीं तो पापापासून मुक्त राहिला नाहीं. त्याच्या दरबारांत शेंकडों राण्या होत्या, त्यांत खनान, सीदोन, तुर, मिसर आणि दुसऱ्या देशच्या राजकन्या होत्या. त्यानी आपले खोटे धर्म यरूशालेमांत आणिले आणि शलोमोनाचें मन मूर्त्तिपूजेकडे फिरविलें.

---

## गोष्ट ५१. राज्याची फूट.

शलोमोनाच्या मरणानंतर इस्राएल लोक शेखेम एथें एकत्र मिळाले. रहाबआम याने आपणास राजा असें मानलें; परंतु जसा राजा आपल्या प्रजेस पुत्राप्रमाणें पाळितो, तसें न करितां जसा एखादा जुलमी आपल्या लोकांवर भयानेच राज्य करण्यास इच्छितो, तसें हा करूं लागला. यास्तव इस्राएल लोकानी त्याजकडे वकील पाठवून सांगितलें कीं, "तुझ्या बापाने आह्मावर कठीण जूं घातलें. यास्तव तुझ्या बापाची कठीण चाकरी, तेंच त्याचें भारी जूं, जें त्याने आह्मावर घातलें, तें आतां कांहीं हलकें कर; ह्मणजे आह्मी तुझी सेवा

करूं." तेव्हां रहाबआम याने असें उत्तर केलें कीं, "जरी माझ्या बापाने तुह्मावर भारी जूं घातलें तरीं आतां मी तुमचें जूं वाढवीन. माझ्या बापाने तुह्मास चाबुकानी शिक्षा केली; परंतु मी तुह्मास विंचवानी शिक्षा करीन." [विंचू हें नाव एका प्रकारच्या तीक्ष्ण कांट्याच्या कोरड्यांस होतें, असें कल्पिलें आहे.] या प्रकारच्या दांडगाईच्या उत्तराने इस्राएल लोकांस भय दाखवावें, असें त्या ज्ञानी शलोमोनाच्या मूर्ख पुत्रास वाटलें, परंतु त्या लोकानीं काय करायाचें होतें, त्याचा पूर्वीच निश्चय केला होता. ते ह्मणाले कीं, "आह्मास दाविदांतील काय वाटा! यिशायाच्या पुत्रांत आह्मास वतन नको. हे इस्राएला, आपापल्या राहोटीस जा; हे दाविदा, आतां तूं आपल्या घराण्याविषयीं पाहा." यहूद्यांतून दाहा वंश बाहेर पडून त्यानीं निराळें राज्य स्थापिलें त्यास इस्राएलाचें राज्य असें ह्मणत. त्यानीं यारोबआम नावाचा एक नामांकित सरदार निवडून त्यास आपला राजा केलें. आणि देवाने तसेंच होऊं दिल्हें. असें कीं जेव्हां त्या दाहा वंशांसीं रहाबआम लढाया करायास जाऊं लागला तेव्हां परमेश्वर त्याजकडे एक भविष्यवादी पाठवून ह्मणाला कीं, "तुह्मी, जाऊं नका; आणि आपले भाऊ जे इस्राएली त्यांसीं लढाई करूं नका. तुह्मी प्रत्येक आपापल्या घरीं माघारें जा. कारण कीं ती गोष्ट मजकडून झालेली आहे." नंतर प्रभूने सांगितल्याप्रमाणें प्रत्येक जण आपापल्या घरीं गेले.

---

## गोष्ट ५२. यारोबआम आणि भविष्यवादी.

तथापि यारोबआमाने इस्राएलाच्या देवाची भक्ति केली नाहीं. त्याने लोकांनी पूजा करावी ह्मणून दोन सोन्याचीं वासरें केलीं. त्यांतून एक बेथेलांत ठेविलें आणि दुसरें दानांत ठेविलें; आणि सणाकरितां लोकांस यरूशालेमांत जाण्याचें बंद केलें. नंतर देवाने यहूद्यांतून एक माणूस पाठविला. तो येऊन यारोबआमाने जेथें स्थंडिल बांधिलें होतें, तेथें उभा राहून ओरडून ह्मणाला, "हे स्थंडिला, स्थंडिला, परमेश्वराने असें सांगितलें आहे कीं, पाहा, दाविदाच्या घराण्यांत पुत्र जन्मेल; त्याचें नाव योशिया होईल; आणि उंचस्थानाचे जे उपाध्ये तुजवर धूप करितात, त्यांस तो यज्ञाने तुजवर अर्पील. आणि माणसाचीं हाडें तुजवर जाळलीं जातील." आणि त्याने त्याच दिवशीं खूण सांगून देतां ह्मटलें कीं, "परमेश्वराने असें सांगितलें, ह्मणून हीच खूण पाहा, हें स्थंडिल फुटलें जाईल, आणि यावर जी राख, ती ओघळली जाईल. तेव्हां यारोबआमाने या गोष्टी ऐकून आपला हात लांब करून ह्मटलें कीं, "त्याला धरा." असें ह्मणतांच त्याचा तो हात वाळला, असा कीं तो मागें आपल्याजवळ आणायास त्याला शक्ति राहिली नाहीं. आणि तें स्थंडिल फुटलें, व त्या स्थंडिलावर राख ओघळली गेली. तें पाहून राजा देवाच्या सेवकाला ह्मणाला, "माझा हात यथास्थित व्हावा ह्मणून आतां तूं आपल्या परमेश्वरापुढें मजविषयीं काकळूत करून प्रार्थना कर." तेव्हां देवाच्या माणसाने परमेश्वराची प्रार्थना केली. मग राजाचा हात पहिल्यासारिखा झाला.

त्यानंतर देवाने सांगितल्याप्रमाणें तो सेवक लागलाच नीट घराकडे परतला. परंतु बेथेल एथील एक ह्मातारा भविष्यवादी त्याच्या मागून जाऊन त्यास ह्मणाला कीं, "तूं मजबरोबर घरीं चल आणि भाकर खा." असें तें देवाच्या आज्ञेविरुद्ध कपटी भाषण ऐकून तो त्याच्या घरीं गेला आणि तेथून पुनः परत येत असतां, वाटेंत त्यास एक सिंव्ह भेटला. त्याने त्यास जिवें मारिलें पण त्याला न खातां त्या प्रेताजवळ तो उभा राहिला. आणि त्याच्या बाजूस त्याचें गाढवहि राहिलें. मग तो वडील भविष्यसूचक येऊन त्याने त्यास पुरलें.

इतकें झालें तरी यारोबआम आपल्या कुमार्गापासून फिरला नाहीं. तेव्हांपासून इस्राएल लोकांत कांहीं आबादानी झाली नाहीं. एकामागें एक राज्याच्या उलटापालटी होऊं लागल्या. एक राजा गादीवर बसला नाहीं इतक्यांत दुसऱ्याने येऊन त्यास पदच्युत करून त्यास व त्याच्या कुटुंबास जिवें मारावें. आणि त्याजवरहि त्यापेक्षां दुष्ट येऊन गादीवर बसावा असें चाललें होतें. आणि त्यांतून प्रत्येकाने यारोबआमाचेंच पापकर्म चालवून सोन्याच्या वासरांची पूजा केली इतकेंच नाहीं परंतु विधर्मी लोकांच्या सर्व मूर्त्तीपूजा व त्यांच्या अघोरी रीती या हळहळू चालूं केल्या. आणि सर्व आनाचार शिरण्याचा दरवाजा मोकळा केला.

---

## गोष्ट ५३. एलिया भविष्यवादी.

आहाब हा राजा मागील सर्व राजांपेक्षां फार दुष्ट होता. आणि त्याची बायको यिजेबेल सिडोन या दे-

शची राजकन्या, इने सिदोनांतील मूर्त्तींकरितां शोमरोन देशांत एक शोभायमान देवालय बांधिलें. बाहल जो सूर्याचा देव त्याच्या सेवेकरितां तिने चारशें पन्नास उपाध्ये ठेविले होते. आणि आष्टारोध जी चंद्राची देवी तिच्या पुजेकरितां चारशें पुजारी ठेविले होते. अमंगळ व निर्लज्ज रीतीकडून त्या देवांची भक्ति होत असे. अणखी




तिने इस्राएलाच्या देवाची भक्ति करणाऱ्यांची छळणूक केली व त्यांच्या भविष्यवाद्यांस जिवें मारिलें. तथापि आहबाजवळ जीं मनुष्यें असत त्यांमध्यें गुप्तरूपें ईश्वराचें भय बाळगणारा ओबादिया नामें असा एक मनुष्य होता. त्याने प्रभूच्या शंभर भविष्यवाद्यांस आश्रय देऊन गुहेंत लपवून अन्नपाणी पुरवून दिल्हें होतें.

तेव्हां एलिया भविष्यवादी राजापुढें उभा राहून ह्मणाला कीं, “परमेश्वर देव ज्याच्यापुढें मी उभा राहतों, तो जिवंत आहे, एवढ्या निश्चयाने मी सांगेन तोंपर्यंत पाऊस होणार नाहीं.” नंतर त्या देशामध्यें दुकाळ पड-

ला आणि एलिया भविष्यवादी करीथ ओहोळाजवळ लपून राहिला आणि तेथें संध्याकाळीं भाकर व मांस त्याच्याजवळ कावळे आणीत असत; आणि तो त्या ओहळांतलें पाणी पीत असे. नंतर असें झालें कीं तो ओहोळ सुकला तेव्हां परमेश्वराने त्यास सांगितलें कीं, "तूं उठून जिदोनाकडल्या जारेफाथास जाऊन तेथें राहा. पाहा, तेथल्या विधवा स्त्रीने तुला पुरवटा करावा, ह्मणून म्या तिला आज्ञा केली आहे." यास्तव तो उठून त्या नगराच्या वेशीपर्यंत पोहंचला असतां पाहा कीं तेथली विधवा स्त्री लांकडें गोळा करीत होती. तेव्हां त्याने तिजपासीं थोडेसें पाणी मागितलें आणि ती आणायाला जात असतां त्याने तिला हाक मारून ह्मटलें, "तूं कृपाकरून मजकरितां आपल्या हातीं भाकरीचा तुकडा घेऊन ये." तेव्हां ती गरीब बायको ह्मणाली, "तुझा परमेश्वर जिवंत आहे, एवढ्या निश्चयाने माझ्या जवळ चांदकी देखील नाहीं; केवळ मडक्यांतील मूठभर पीठ व कुपींत थोडें तेल आहे. तर पाहा दोन लांकडें जमाकरून जाऊन आपल्यासाठीं व आपल्या पुत्रासाठीं तें सिद्ध करितें मग आह्मी तेवढें खाऊन तर मरून जाऊं." तेव्हां एलियाने तिला ह्मटलें, "तूं भिऊं नको, जाऊन आपल्या ह्मटल्याप्रमाणें कर. पण पहिल्याने माझ्यासाठीं त्यांतून लहान चांदकी करून बाहेर माझ्या जवळ आण. आणि त्यानंतर आपल्यासाठीं व आपल्या पुत्रासाठीं सिद्ध कर. कारण इस्राएलाच्या देवाने असें सांगितलें आहे कीं, भूमीच्या पाठीवर परमेश्वर पाऊस पाडील, त्या दिवसापर्यंत मडक्यांतलें पीठ संपणार नाहीं, किंवा

कुपींतील तेल सरणार नाहीं." नंतर त्या गरीब विधवा स्त्रियेबराबर तो एक वर्षापेक्षां जास्ती दिवस राहिला. आणि त्याने सांगितल्याप्रमाणें मडक्यांतील पीठ सरलें नाहीं, व कुपींतील तेलहि खपलें नाहीं.

पाऊस पडण्याचें बंद होऊन जेव्हां तीन वर्षें व साहा महिने झाले, तेव्हां परमेश्वर एलियाला ह्मणाला कीं, "तूं जाऊन आहबाच्या दृष्टीस पड. मग मी भूमीच्या पाठीवर पाऊस पाठवीन." जेव्हां आहबाने एलियास आपल्याजवळ येतांना पाहिलें, तेव्हां तो ओरडून ह्मणाला "जो इस्राएलाला दुःख देतो, तो तूंच कीं काय ?" तेव्हां हा बोलला कीं, "म्या इस्राएलास दुःख दिल्हें नाहीं; परंतु त्वां आणि तुझ्या बापाच्या घराण्याने दिल्हें; कसें तर तुह्मी परमेश्वराच्या आज्ञा सोडिल्या आणि बाहल जो सूर्याचा देव त्याच्या मागें लागलां आहां."

नंतर त्या भविष्यवाद्याच्या सांगण्यावरून इस्राएलाची व बाहल देवाच्या साडेचारशें उपाध्यांची कार्मेल डोंगरावर सभा मिळविली. तेव्हां एलियाने लोकांस ह्मटलें कीं, "तुह्मी कोठपर्यंत दोहो तडांत लडबडतां ! परमेश्वर जर देव तर त्याच्या मागें चाला; किंवा बाहल जर देव आहे, तर त्याच्या मागें चाला." परंतु लोकांनी त्यास एक शब्दहि उत्तर केलें नाहीं. तेव्हां एलिया त्यांस ह्मणाला, "परमेश्वराकडला भभिष्यवादी मी राहिलों, केवळ मीच; परंतु बाहलाकडले साडेचारशे पुरूष आहेत. तर आह्मास दोन बैल द्यावे व त्यांतून एक बैल त्यानी आपणाकरितां निवडून घ्यावा आणि त्यानी त्याचे तुकडे करून लांकडावर ठेवावे; पण विस्तू

लावूं नये; मग मीहि दुसरा बैल सिद्ध करून लांकडावर ठेवीन आणि विस्तू लावणार नाहीं. नंतर तुह्मी आपल्या देवाचें नाव घ्यावें आणि मीहि परमेश्वराचें नाव घेईन. मग जो देव विस्तू करून उत्तर देईल, तोच देव जाणावा." हें ऐकून सर्व लोकांनी उत्तर दिल्हें कीं, ही बरी गोष्ट आहे.

नंतर बाहल देवाच्या उपाध्यानी आपला बैल मारून स्थंडिलावर ठेविला आणि त्याच्या भोंवताले ते आपल्या रीतीप्रमाणें नाचले व सकाळपासून दोन प्रहरापर्यंत आपल्या देवाच्या नावाने ओरडले कीं, "हे बाहल देवा, आमचें ऐक." तथापि तेथें शब्द झाला नाहीं, किंवा कोणी उत्तरहि दिल्हें नाहीं. तें पाहून एलियाने त्यांची थट्टा करून ह्मटलें, "तुह्मी मोठ्या शब्दाने हाक मारा, कां कीं तो देव आहे. कदाचित् तो ध्यान करीत असेल, किंवा त्याला बाहेर अथवा वाटेवर जावें लागलें असेल. कोण जाणे, तो निजला असला तर जागा केला पाहिजे." तेव्हां ते मोठ्यानी ओरडले व सुऱ्यानी व भाल्यानी आपणांस रक्त येईपर्यंत घाव मारून घेतले, तथापि तेथें कांहीं शब्द झाला नाहीं, अथवा कोणी उत्तर दिल्हें नाहीं.

नंतर संध्याकाळीं जेव्हां देवळाच्या रीतीप्रमाणें बळि अर्पण करावयाची वेळ आली, तेव्हां एलियाने एक स्थंडिल रचलें आणि त्या सभोवतीं एक चरी खणली. आणि ती चरी भरून जाईपर्यंत त्याने लांकडावर व स्थंडिलावर पाणी ओतविलें. नंतर एलियाने प्रार्थना करून ह्मटलें, "हे परमेश्वरा, आब्राहामाच्या, इझाकाच्या, व इ-

स्राएलाच्या देवा, तूं इस्राएलावर देव आणि मी तुझा सेवक आहें, आणि म्यां या अवघ्या गोष्टी तुझ्या सांगण्यावरून केल्या आहेत, याविषयीं तूं या लोकांची खातरी कर." या प्रकारची प्रार्थना करितांच परमेश्वराचा अग्नि पडला. आणि तेणेंकरून होमद्रव्य व तीं लाकडें व ते धोंडे माती भस्म झालीं, आणि त्या चरींत जें पाणी होतें, तें शोषलें गेलें. आणि जेव्हां सर्व लोकानी तें पाहिलें, तेव्हां त्यानी आपल्या तोंडावर पालथे पडून ह्मटलें, "परमेश्वर, तोच देव आहे; परमेश्वर तोच देव आहे." नंतर एलियाने त्यांस सांगितलें, "तुह्मी बाहल देवाच्या उपाध्यांस धरा, त्यांतून कोणाला पळूं देऊं नका." मग त्यानी त्यांस धरल्यावर किशोन ओहळावर नेऊन त्यांस तेथें वधिलें.

नंतर एलिया कार्मेल डोंगराच्या शिखरावर जाऊन पाऊस पडण्याकरितां त्याने सातवेळ ईश्वराची प्रार्थना केली. आणि पाऊस येतो कीं काय, हें समजण्याकरितां त्याने आपल्या चाकरास वर जाऊन न्याहाळून पाहावयास सांगितलें. तेव्हां तो चाकर साहावेळ वर गेला आणि सातव्या वेळीं परत येऊन ह्मणाला कीं, "पाहा, मनुष्याच्या हाताएवढा लाहान ढग समुद्रावरून चढत आहे." मग एलियाने आहाब यास निरोप पाठविला, "तूं आपला रथ तयार करून खालीं जा; पावसाने तुला एथें थांबवूं नये ह्मणून. नंतर लागलेंच ढगाने आकाश काळें झालें आणि मोठा पाऊस पडला.

---

## गोष्ट ५४. अहजिया आणि त्याचे सरदार.

आहबाचा पुत्र अहाजिया हा दुखणाइत होता ह्मणून तो बरा होईल कीं नाहीं, याची विचारपूस करण्यास पलिष्टी लोकांचा देव बाहलजबूब याकडेस त्याने जासूद पाठविले. तेव्हां ईश्वराच्या आज्ञेने एलिया त्या मनुष्यास भेटायास जाऊन ह्मणाला कीं, "तुह्मी एक्रोनचा देव जो बाहलजेबूब याजपासीं विचारायास जातां, तर इस्राएल लोकांत देव नाहीं कीं काय? यास्तव परमेश्वर असें ह्मणतो कीं, ज्या आंथरूणावर तूं गेला आहेस त्यावरून खालीं येणार नाहींस; परंतु तूं मरसीलच मरसील." हें ऐकतांच जासूद माघारें फिरले, आणि त्यांजवळ जें कांहीं ह्मटलें होतें, तें त्यांनी राजास सांगितलें. हें ऐकून राजाने विचारिलें कीं, जो हे शब्द बोलला, तो कोणत्या प्रकारचा मनुष्य आहे? तेव्हां ते ह्मणाले कीं, "तो केसाळ पुरूष होता आणि त्याच्या कमरेस कातड्याचा कंबरबंद होता." तेव्हां राजा ह्मणाला कीं, "तो तिश्बेकर एलिया आहे."

नंतर त्याने त्यास कैद करून आणण्याकरितां एका सरदाराबरोबर पन्नास मनुष्यें देऊन पाठविलें. त्या वेळीं एलिया डोंगराच्या शिखरावर उभा होता. त्यास पाहून तो सरदार ह्मणाला, "हे देवाच्या माणसा, राजाने सांगितलें आहे कीं, तूं खालीं ये." तेव्हां एलिया ह्मणाला, "जर मी देवाचा माणूस असेन, तर आकाशांतून अग्नि येऊन तुला व तुझ्या पन्नास मनुष्यांला जाळून भस्म करो." असें त्याने ह्मटलेंच त्याप्रमाणें घडलें. तेव्हां राजाने दुसरा एक सरदार पाठविला; परंतु तोहि आपल्या पन्नास

माणसांसुद्धां आकाशांतील अग्नि पडून भस्म झाला. नंतर एलियास नेण्याकरितां तिसरा एक सरदार आला. तो एलियापुढें गुढघे टेकून ह्मणाला; "हे देवाच्या माणसा, माझा आणि या तुझ्या पन्नास मनुष्यांचा जीव तुझ्या दृष्टींत बहुमोल्य दिसावा ह्मणून मी तुझी प्रार्थना करितों." हें ऐकून एलियाने त्याजबरोबर खालीं राजाजवळ जाऊन ह्मटलें कीं, "ज्याची वाणी विचारून घ्यावी, असा इस्राएलांत कोणी देव नाहीं ह्मणून बाहलजेबूब जो एक्रोनाचा देव याजवळ विचारायास जासूद पाठविले आहेस काय? ज्यापेक्षां तूं असें केलेंस त्यापेक्षां तूं ज्या अंथरूणावर गेला आहेस, त्यावरून खालीं येणार नाहींस. तर तूं मरसीलच मरसील." नंतर त्याप्रमाणें तो मेला आणि त्याच्या मागें त्याला पुत्र नव्हता.

---

## गोष्ट ५५. अलीशा.

ईश्वराच्या आज्ञेवरून एलियाने आपल्या जाग्यावर दुसरा भविष्यवादी होण्याकरितां अलीशा यास बोलाविलें. नंतर अग्नीच्या रथांतून वावटळीने एलिया आकाशांत जातानां अलीशाने पाहिलें आणि एलियाची शक्ति आणि वारें त्याजवर आलें. एकदां असें झालें कीं, बेथेल ज्या ठिकाणीं सुवर्णाचें वासरूं स्थापिलें होतें, तेथें कित्येक दुष्ट तरूण मनुष्यानी अलीशाची थट्टा करून ह्मटलें, "बोडक्या, तूं वर जा." अलीशा चांगलें जाणत होता कीं, सहनतेची वेळ कोणती व शासन करण्याची वेळ कोणती. त्याने हे शब्द ऐकतांच परमेश्वराच्या नावाने त्यांस श्राप

दिल्हा. तेव्हां अरण्यांतून दोन आस्वली येऊन त्या तरूण मनुष्यांतून बेचाळिसांस त्यानी फाडून टाकलें.

कोणी एका ठिकाणीं अलीशा गेला होता, तेथें भविष्य-सूचक मनुष्याचें विद्यागृह होतें. तेथें एका भविष्य-वाद्याची विधवा स्त्री अलीशास पाहून हाक मारून ह्मणा-ली, "माझा नवरा मेला आणि माझ्या दोन पुत्रांस चा-कर करावें ह्मणून सावकार आला आहे." तेव्हां अली-शाने तिला विचारिलें, "तुझ्या घरांत काय आहे?" तेव्हां तिने सांगितलें, "एका तेलाच्या भांड्याशिवाय मा-झ्या घरांत दुसरें कांहीं नाहीं." मग तो ह्मणाला, "जा, आणि भांडीं उसनीं मागून आण. पण तीं थोडीं आणूं नको, आणि जेव्हां तूं आंत येसील तेव्हां आपल्या मागून व आपल्या पुत्राच्या मागून दरवाजा बंद कर. नंतर



त्या भांड्यांत तें तेल ओतून जें भरेल तें एकीकडे ठेवीत जा." हें ऐकून त्या गरीब स्त्रीने तसें केलें. आणि पुष्कळ भांडीं तेलाने भरलीं आणि आपल्या पुत्रास ह्मणा-

ली कीं, "अणखी दुसरें एक भांडें मला आणून दे." पण तो ह्मणाला कीं, "आतां दुसरें एकहि भांडें नाहीं." मग तें तेल राहिलें. आणि तिने येऊन त्या देवाच्या माणसास तें सर्व सांगितलें. तेव्हां तो ह्मणाला, "जा आणि तें तेल वीक व सावकाराचें कर्ज फेड. नंतर जें कांहीं उरेल तेणेंकरून तूं आपल्या पुत्रासुद्धां निर्वाह कर."

---

## गोष्ट ५६. नामान.

नामान हा आराम देशच्या राजाचा सेनापति होता. तो आपल्या धन्याजवळ मोठ्या मान्यतेचा माणूस होता; परंतु त्याला कोड होतें. तेव्हां असें झालें कीं इस्राएलाच्या देशांतून पाडाव करून आणलेली असी एक लहान मुलगी नामानाच्या बायकोजवळ दासी होती. ती एका दिवसीं ह्मणाली कीं, "माझा धनी शोमरोनांतील भविष्यसूचकाजवळ असता तर किती बरें झालें असतें! त्याने तेव्हांच त्यास बरें केलें असतें." हें तिचें भाषण नामानास समजतांच तो इस्राएलाच्या देशीं जावयास निघाला. आणि घोडे व रथ यांसहित अलीशा याच्या दारापुढें येऊन उभा राहिला. अलीशास तें समजतांच त्याने त्यास निरोप पाठविला कीं, "तूं जाऊन यार्देन नदींत सातवेळां स्नान कर, ह्मणजे तुझ्या अंगाची शुद्धता तुला फिरून मिळेल." हें ऐकून नामानास मोठा राग आला. आणि ह्मणाला, "पाहा, मी असें समजलों होतों कीं, तो माझ्याजवळ खचित बाहेर येईल व उभा राहून आपला परमेश्वर जो देव त्याचें नाव घेऊन आपला हात माझ्या अंगावर फिरवून मला कोड्याला बरें क-

रील. आपल्या अबाना व फारफार, दामासेकाच्या नद्या इस्राएलाच्या पाण्यापेक्षां बऱ्या नाहींत कीं काय? त्यांत स्नान करून मी शुद्ध होऊं नये कीं काय?" असें ह्मणून तो रागाने मागें फिरून चालला.

नंतर त्याचे चाकर त्याजवळ येऊन बोलले कीं, "हे माझ्या बापा, त्या भविष्यवाद्याने तुला एखादी मोठी गोष्ट करायास सांगितली असती, तर त्वां केली नसती कीं काय? तर त्याने 'स्नान करून शुद्ध हो.' एवढेंच तुला सांगितलें आहे ह्मणून त्वां किती विशेषेंकरून करावेंस? नंतर त्याने खालीं जाऊन देवाच्या माणसाने सांगितल्या प्रमाणें यार्देनेंत सातवेळा बुडकुळी मारिली, तेव्हां त्याचें आंग लाहान मुलाच्या आंगाप्रमाणें होऊन तो शुद्ध झाला. मग तो, त्या देवाच्या माणसाजवळ येऊन त्यास बक्षीस देऊं लागला; आणि ह्मणाला कीं, "इस्राएल लोकांचा देव त्याशिवाय या सर्व पृथ्वींत दुसरा कोणी देव नाहीं. तर आतां तूं कृपा करून, आपल्या सेवकाकडून भेट घे." परंतु अलीशा ह्मणाला कीं, "ज्यापुढें मी उभा राहतों, तो परमेश्वर जीवंत आहे एवढ्या निश्चयाने मी तुजपासून कांहीं घेणार नाहीं." हें ऐकून नामानाने त्यास तें घेण्याविषयीं आग्रह केला; परंतु अलीशाने तें मान्य न करितां त्यास ह्मटलें कीं, "तूं सुखरूप जा."

परंतु गेहजी या नावाचा अलीशाचा एक चाकर होता. त्याने आपल्या धन्याने सोनेरूपें व चांगलीं वस्त्रें घेतलीं नाहींत असें पाहून तो त्याविषयीं इच्छा करूं लागला आणि तो नामानाच्या पाठिमागें जाऊं लागला. जेव्हां नामानाने त्यास आपल्या मागून धांवत येतांना पा-

हिलें तेव्हां तो त्यास भेटायाकरितां रथावरून खालीं उतरला आणि ह्मणाला, सर्व क्षेम आहे ना?" मग तो बोलला कीं, "होय, सर्व क्षेम आहे. पण भविष्यसूचकांतील दोघे तरूण शिष्य एफ्राइम डोंगरावरून माझ्या धन्याजवळ आले आहेत. तर आतां त्यांच्यासांठीं एक मण रूपें व दोन पोषाख, असें दे." तेव्हां नामान ह्मणाला कीं; "तूं दोन मण घे." नंतर त्याने त्यास आग्रह करून तितकें द्रव्य दोन पिशव्यांत भरून दोन पोषाखांसुद्धां आपल्या दोन चाकरांजवळ देऊन त्याजबरोबर पाठविलें. मग जेव्हां तो टेंकडीपर्यंत आला तेव्हां त्याने तें त्यांच्याजवळून घेऊन आपल्या घरीं नेलें; आणि त्या माणसांस परत पाठवून देऊन नंतर आपल्या धन्याच्या समोर जाऊन उभा राहिला. त्याला पाहून अलीशा ह्मणाला, कीं "तूं कोठून आलास?" तेव्हां तो बोलला, "तुझा सेवक कोणिकडे गेला नव्हता." नंतर तो त्याला ह्मणाला, "जेव्हां तो मनुष्य तुला भेटायास आपल्या रथावरून उतरला, तेव्हां माझें मन तेथें गेलें नव्हतें कीं काय? पैका घेण्याच्या किंवा वस्त्रें वाड्या किंवा द्राक्षमळे, बकरीं किंवा बैल आणि चाकर किंवा दासी घ्याव्या असा वेळ आहे कीं काय? यास्तव नामानाचें कोड तुला आणि तुझ्या वंशाला अक्षय लागेल." असें ह्मणतांच तो बर्फाप्रमाणें शुभ्र असा कोडी होऊन त्याच्या पुढून निघून गेला.

मग इस्राएल लोकांचा राजा आरामी लोकांसीं लढाई चालवीत होता; त्या वेळीं शत्रूच्या छावणींत ज्या ज्या गोष्टी होत त्या सर्व अलीशा आपल्या राजास सां-

गत असे. तेव्हां आरामी राजाने त्या भविष्यवाद्याला धरण्याकरितां तो डोथान एथें राहत होता त्या ठिकाणीं फौज पाठविली. तिने रात्रीं येऊन तें शहर वेढिलें प्रातःकाळीं अलीशाचा चाकर उठला तेव्हां घोडे इत्यादिकांकडून आपलें नगर वेढिलें पाहून तो ह्मणाला कीं, "आहा, आमच्या धण्या, आतां आह्मी कसें करावें?" तेव्हां तो ह्मणाला कीं "भिऊं नका. कारण कीं जे त्याच्याजवळ आहेत, त्यांच्यापेक्षां आपल्याजवळ पुष्कळ आहेत." मग अलीशाने ईश्वराची प्रार्थना करून ह्मटलें, हे प्रभू, याने पाहावें ह्मणून तूं याचे डोळे उघड." परमेश्वराने तसेंच केलें आणि अलीशाच्या भोवतां डोंगर, घोडे आणि अग्नीचे रथ यानीं भरला आहे, असें त्या चाकराने पाहिलें.

---

## गोष्ट ५७. इस्राएलाचें दासत्व.

आहाबानंतर इस्राएलाच्या दाहा कुळांच्या राज्यावर बारा राजे झाले परंतु त्यानीं थोडा वेळ राज्य केलें. एकजण दुसऱ्यास मारून त्याच्या गादीवर बसे. जेथें वारंवार राजे बदलतात त्या देशांत फार दुःख असतें. आरामी लोकानीं येऊन तो देश लुटला आणि ओस पाडला. तथापि तेणेंकरून लोक प्रबोधित होतना. भविष्यवाद्यानीं त्यांस अधिकाधिक धमकी देऊन उपदेश केला; परंतु लोक मूर्त्तिपूजेंत व दुष्टकर्मांत जास्तीच शिरूं लागले. शेवटीं असें झालें कीं आश्शूरी या नावाच्या लढाऊ व पराक्रमी लोकानीं येऊन त्यांस जिंकिलें आणि त्यांस खंडणी देण्याचें कबूल केलें. इस्राएल

लोकांचा राजा होशिया याने शालमानेसर याजबरोबर सल्ला राखण्याविषयीं शपथ घेतली होती; पण नंतर त्याने शपथभंग केला ह्मणून शालमानेसर राजाने मोठें सैन्य घेऊन त्याजवर स्वारी केली. आणि शोमरोन (समारिया) देशाचा नाश करून इस्राएलाच्या दाहा घराण्यांतील बहुतेक लोकांस आरमिनी देशीं व अणखी आपल्या राज्यांतील दूर प्रदेशीं नेलें. शोमरोनांत केवळ थोडे लोक राहिले होते. आणि जे लोक त्याने नेले होते त्यांच्या ओसाड पडलेल्या देशांत राहण्यास त्याने आराम व मेसोपोतामिया व दुसरे मूर्त्तिपूजकांचे देश यांतून लोक पाठविले. त्यांनी तेथें राहण्याच्या प्रारंभीं परमेश्वराचें भय धरिलें नव्हतें. यास्तव परमेश्वराने त्यांजवर सिंव्ह पाठवून कित्येकांस मारिलें. तेव्हां त्या लोकानी हें वर्त्तमान आश्शूरी देशाच्या राजास कळविलें. तें ऐकून त्याने अशी आज्ञा दिली कीं, पाडाव करून आणलेल्या उपाध्यांतून एकाने तेथें जाऊन त्या लोकानी परमेश्वराचें भय कसें बाळगावें, हें शिकवावें. तथापि त्यांच्या सभोवतां जे विधर्मी लोक होते त्याप्रमाणें ते आपल्या देवास भजत राहिले.

याप्रमाणें दाहा कुळांच्या राज्याची समाप्ति झाली. जे कोणी थोडे इस्राएल लोक तेथें शेष राहिले होते, ते जे मूर्त्तिपूजक लोक तेथें येऊन वसले होते, त्यांत मिसळून गेले. आणि तेव्हांपासून समारिया लोक उत्पन्न झाले.

---

## गोष्ट ५८. योना भविष्यवादी.

आश्शूरी लोकांकडेहि देवाने इस्राएल लोकांतून एक

भविष्यसूचक मनुष्य पाठविला. निनवें जी त्या लोकांची राजधानी, तें द्रव्ययुक्त आणि शोभायमान शहर होतें. त्याचा घेर तीन दिवसांच्या मजलींचा होता. देवाने योनास सांगितलें कीं, "तूं उठ आणि निनवें ह्मणून जें मोठें नगर आहे तेथें जा, आणि मोठ्याने लोकांचा निषेध कर कारण कीं त्यांचें दुष्टपण मजसमोर आलें आहे." परंतु योनाने तें न मानून उलटून समुद्राकडे गेला. तो योप्पा गावांत पोहंचून तेथें तारशिषाला जाणारें एक जाहाज पाहून आपण ईश्वराच्या समोरून जाण्याकरितां उतार देऊन त्यांत बसला. नंतर असें झालें कीं, तो जात असतां मार्गांत परमेश्वराने एक तुफान उठविलें; तेणेंकरून तारूं बुडून जाईल असें आंतील लोकांस वाटलें. त्या संकटसमयीं प्रत्येक जण आपापल्या देवाचा धावा करूं लागले. आणि तारूं हलकें करण्याकरितां त्यांत जो माल होता, तो त्यांनीं बाहेर समुद्रांत टाकून दिल्हा; योना तर तारवाच्या खालच्या मजल्यांत निजला होता. ह्मणून त्या तारवाचा नाखवा त्याजवळ येऊन ह्मणाला, "हे निजणाऱ्या तुझ्या मनांत काय आहे? ऊठ आणि आपल्या देवास हाक मार." नंतर ते एकमेकास ह्मणाले कीं, "चला आतां आपण चिठ्ठ्या टाकूं, ह्मणजे कोणाकरितां हें अरिष्ट आपणावर आलें, हें आपणास समजेल. नंतर त्यांनीं चिठ्ठ्या काढल्यावर योनाच्या नावची चिठ्ठी निघाली. तेव्हां तो त्यांस ह्मणाला कीं, "मला उचला आणि समुद्रांत टाका ह्मणजे तुह्मावर समुद्र शांत होईल, कां कीं हें मोठें तुफान तुह्मावर येण्यास कारण मीच आहें." मग

त्यानीं देवाची प्रार्थना केली. "हे प्रभू, आह्मी तुझी विनंती करितों कीं या मनुष्याचा जीव घेतल्यामुळें आ-ह्मास मरूं देऊं नको, आणि निर्दोषी रक्त पाडण्याचा दोष आह्मावर आणूं नको." असें ह्मणून त्यानीं यो-नास उचलून समुद्रांत टाकिलें; तेव्हां समुद्र थंड झाला. हें पाहून ते लोक ईश्वरास फार भ्याले आणि त्यानीं त्यास बलिअर्पणें केलीं व नवस केले. इकडे योनास गिळ-ण्याकरितां ईश्वराने एक मोठा मत्स्य उत्पन्न केला हो-ता, त्यांत त्याने त्यास जीवंत राखिलें आणि तीन दिवस व तीन रात्रींनंतर त्या माशानें त्यास बाहेर जमिनीवर टाकिलें.

नंतर पुनः ईश्वराचा शब्द योनाकडे आला तो असा कीं, "ऊठ आणि निनवे जें मोठें शहर तेथें जा, आणि जो उपदेश मी तुला सांगितला आहे, तो त्यांस सांग." तेव्हां योना उठून निनवे शहरास गेला आणि तेथील रस्त्यांत उभा राहून ह्मणाला कीं, "चाळीस दिवसानीं निनवेचा नाश होईल." लोकानीं हें ऐकून त्या भविष्य-वाद्याचे शब्द खरे मानिले आणि फार भयाभीत झाले. आणि उपास करून ते आंगावर गोणपट पांघरूं लाग-ले. तेथील राजाने आपला पोषाख काढून ठेविला आणि असा धांडोरा पिटविला कीं, "कोणी मनुष्य अ-थवा पशू, खिल्लारें किंवा कळप यानीं कांहीं खाऊं न-ये; आणि प्रत्येकानीं आपल्या शक्त्यानुसार ईश्वराचा धा-वा करावा आणि आपल्या कुमार्गापासून फिरावें; कां कीं कदाचित् परमेश्वर आपला क्रोध सोडून प्रसन्न होईल." नंतर ते लोक आपल्या दुराचरणापासून फिरले हें पा-

हून देवाने तें शहर बांचविलें, आणि लोकांवर नाश आणिला नाहीं. परंतु या ईश्वरी कृपेस योना नाखूश झाला आणि ह्मणाला कीं, "वांचण्यापेक्षां मरावें हें मला बरें आहे." असें ह्मणून तो शहराच्याबाहेर गेला आणि एक छपरी बांधून तिच्या छायेंत बसला. नंतर रात्रींत ईश्वराने तेथें एक भोंपळ्याचें झाड रुजविलें आणि प्रातःकाळीं तें आपल्या सुंदर पल्लवाच्या योगाने योनास चांगली शीतल छाया करितें झालें. तें पाहून तो फार आनंदी झाला. दुसऱ्या दिवसीं ईश्वराने तेथें एक किडा आणून तेणेकरून त्या भोंपळ्याचा नाश केला यास्तव जेव्हां सूर्य फार तापला तेव्हां त्याचीं पानें सुकलीं; व योनाच्या डोईवर सूर्य तापूं लागला. तेव्हां योना पुनः मरणाची इच्छा धरून ह्मणाला कीं, "जगण्यापेक्षां मला मरण बरें आहे." मग देवाने त्यास ह्मटलें कीं, "भोंप-



ळ्याकरितां रागें भरणें, हें तूं ठीक करितोस कीं काय?" त्यास योनाने उत्तर दिल्हें कीं, "मरणपावेतों रागें भरणें यांत ठीक करितों." मग देव ह्मणाला कीं, "ज्याकरितां

तूं मेहनत केली नाहींस किंवा त्यास वाढविलें नाहींस, जें एका रात्रींत उत्पन्न झालें आणि एका रात्रींत नाश पावलें त्या झाडाची दया केलीस, तर निनवे शहर, ज्यांत लहान बाळक आपल्या उजव्या हाताचें व डाव्या हाताचें भिन्नत्व न समजणारे असे एक लक्ष वीस हजारापेक्षांहि अधिक आहेत, आणि ज्यांत पुष्कळ गुरें आहेत, असें जें मोठें निनवे शहर त्याचें मी रक्षण करूं नये कीं काय?"

---

## गोष्ट ५९. यहुदा देशांतील शेवटचे राजे.

राज्याचे विभाग झाल्यानंतर तीनशे बासष्ट वर्षांत दाविदाच्या गादीवर बावीस राजे बसले आणि दाहा कुळांच्या राज्याची समाप्ति झाल्यानंतर यहूद्याचें राज्य शंभर वर्षेंपर्यंत होतें; परंतु दाविदाच्या वंशांतहि चांगल्या राजापेक्षां अधार्मिक व दुष्ट असेच पुष्कळ झाले. यहोशाफाट व हिजकिया यांचीं नावें इतिहासांत कांहीं प्रकाशतात; सभोंवतील अंधकारामध्यें ते लहानस्या उजेडाप्रमाणें दिसतात.

आहाज याने यरुशालेमाच्या रस्त्यांत बाआलदेवाकरितां यज्ञस्थंडिलें बांधिलीं, व परमेश्वराच्या घराचे दरवाजे बंद करविले. आणि कांहीं वेळपर्यंत ज्याचा धणी मेला व जें विकत द्यायाचें अस्या घराप्रमाणें देवाचें देऊळ होतें.

दुष्ट आहाजाचा धार्मिक पुत्र, हिजकिया हा राज्य करूं लागला, तेव्हां त्याने देवळाचे दरवाजे उघडविले. आणि यरुशालेमांतील सर्व मूर्त्ती काढून टाकिल्या. त्या

मूर्तीमध्यें मोश्यानें जो पितळेचा सर्प अरण्यामध्यें वर उचलिला होता, तो आजपर्यंत लोकानी राखून ठेविला होता. बुद्धिभ्रष्ट झालेले जे यहुदी लोक ते या पितळेच्या पदार्थापुढें धूप जाळीत, व पुजा करीत होते. सर्पानें चावलेल्या इस्राएल लोकांस यहोवानेच बरें केलें, त्या पदार्थानें केलें नाहीं असें त्यानी मनांत आणिलें नाहीं. हिजकियानें हें चांगलें व अगत्याचें काम केल्यानंतर आपल्या वडिलांच्या देवाकडे पुनः फिरावें, व वल्हांडण सण करण्यास वर यरूशालेमांत यावें ह्मणून त्याने दाहा कुळांच्या लोकांस पत्रें पाठविलीं. हा राजा राज्य करीत असतां आश्शूरी लोकानी दाहा कुळें कैदेंत नेलीं, आणि जे हजारों इस्राएल लोक आपलें रक्षण करण्याकरितां यहुदा देशांत शरण येऊन राहिले होते. तेणेंकरून त्याच्या राज्यास बळ मिळालें होतें. आश्शूरी देशाचा राजा जो शाल्मानेसर त्याच्या मागून सन्हाखरीब हा गादीवर बसला. त्याने फौज पाठवून यहुद्यांतील सर्व बळकट नगरें घेतलीं, व यरूशालेमास वेढा घातला; परंतु जेव्हां तो जिवंत देवाविषयीं धिःकारपूर्वक बोलूं लागला, तेव्हां हिजकियानें आपलीं वस्त्रें फाडून इस्राएलाच्या देवाची प्रार्थना केली. नंतर परमेश्वराच्या दूतानें जाऊन एका रात्रींत आश्शूरी लोकांच्या लष्करांत एकलक्ष पंचायशी हजार मनुष्यांस मारिलें आणि सकाळीं उठायाच्या वेळेस पाहिलें तों सर्व प्रेतवत झालीं.

सुमारे त्या वेळीं हिजकियाला मरणाचें दुखणें लागलें होतें. तेव्हां यशाया भविष्यसूचकानें त्याजवळ येऊन ह्मटलें कीं, "तूं आपल्या घराचा बंदोबस्त कर; कारण

तूं मरणार आहेस, जगणार नाहींस." हें ऐकून हिजकियाने डोळ्यांत अश्रु आणून, आपलें आयुष्य वाढवावें ह्मणून ईश्वराची प्रार्थना केली; नंतर यशाया राजाच्या घराहून जात असतां परमेश्वर त्यास ह्मणाला कीं, "तूं मागें फिर आणि हिजकियास सांग कीं, तुझा वडील दावीद, याचा जो परमेश्वर तो असें ह्मणतो कीं, म्या तुझे अश्रुपात पाहिले; पाहा, मी तुझ्या आयुष्यांत पंधरा वर्षें अधिक वाढवीन." मग यशायाने अंजिराची पेंढ फोडावर बांधायास सांगितलें, आणि तीन दिवसांनंतर राजा बरा होऊन देवाची स्तुति करायास देवळांत गेला.

हिजकियाचा दुष्ट पुत्र मनाश्शे याने पन्नास वर्षें राज्य केलें. त्याने आपल्या धार्मिक बापाने जें बरें केलें होतें, त्याचा नाश केला आणि लोकांस पुनः मूर्तिपूजेस लाविलें. त्याच्या आयुष्याच्या अखेरींत तो बंदिवान होऊन बाबेल शहरांत नेला असा झाला. मग त्याचा अभिमान गेला ह्मणून देवाने त्याची प्रार्थना ऐकून त्यास त्याचें राज्य दिल्हें. तेव्हां त्याने सर्व विधर्मी देव यरूशालेमाच्या बाहेर टाकिले.

मनाश्शे याचा पुत्र आमोन हा आपल्या सर्व पूर्वजांपेक्षां अति दुष्ट होता; परंतु तो बहुत दिवस राहिला नाहीं. कां कीं दोन वर्षांनंतर त्यास त्याच्या चाकरानी मारिलें. त्याच्या मागून त्याचा पुत्र योशिया हा गादीवर बसला त्याचें वय आठ वर्षांचें होतें. आणि परमेश्वराच्या दिसण्यांत जें नीट होतें, तें योशियाने केलें आणि दाविदाच्या मार्गाने चालला. तो सोळा वर्षांचा होता तेव्हांच ईश्वराचा शोध करूं लागला. अणखी त्याने आपल्या राज्याच्या

बाराव्या वर्षीं यरूशालेम आणि सर्व यहुदा प्रांत यांतील मूर्ती काढून टाकिल्या, आणि परमेश्वराचें घर पुनः पूर्व स्थितीवर आणिलें. आणि पाहा कीं तें परमेश्वराचें घर साफ करीत असतां मनाश्श्याच्या वेळीं गमावलेलें व विसरून राहिलेलें असें एक पुस्तक त्यास सांपडलें. तें शास्त्र ह्मणजे मोश्याचें नेमप्रकरण होतें. तें राजापुढें आणून वाचलें, तेव्हां तो त्यांतील गोष्टी ऐकून भय आणि आश्चर्यभरित झाला. तेणेंकरून त्याने आपलीं वस्त्रे फाडून हुल्दा जी भविष्यवादिनी तिजकडे जासूद पाठवून सांगितलें कीं, "तुह्मी जाऊन या सांपडलेल्या पुस्तकांतल्या गोष्टीविषयीं माझ्यासाठीं व सर्व लोकांसाठीं परमेश्वराजवळ विचार करा. कारण परमेश्वराचा जो कोप आह्मावर जळतो, तो मोठा आहे; कशावरून ह्मणाल तर आमच्या वडिलांनी या पुस्तकांतल्या गोष्टी मानिल्या नाहींत." नंतर तिने राजाच्या जासुदास ह्मटलें कीं, "ज्या माणसाने तुह्मास माझ्याजवळ पाठविलें, त्यांस तुह्मी सांगा, परमेश्वर असें ह्मणतो कीं, पाहा, जें पुस्तक यहुद्याच्या राजा पुढें वाचलें, त्यांतील सर्व गोष्टीचें वाईट या ठिकाणावर व यांतल्या राहणाऱ्यावर मी आणितों. कारण कीं त्यांनीं मला सोडिलें, आणि दुसऱ्या देवापुढें धूप दाखवून मला संतापविलें. आणि यहूद्याचा राजा, ज्याने तुह्मास परमेश्वराजवळ विचारायास पाठविलें, त्याला तुह्मी सांगा, जें मी या ठिकाणाविषयीं सांगितलें तें ऐकून तुझें मन कोमळ झालें, आणि त्वां परमेश्वरापुढें नम्रता धरिली, यास्तव तूं सुखाने मरसील. आणि जें कांहीं वाईट मी या ठिकाणावर आणितों तें तुझ्या दृष्टीस पडणार नाहीं."

मोश्याच्या पुस्तकाप्रमाणें लोकांत सर्व नियम चालूं करावे, असी योशियाची मोठी इच्छा होती. त्याने लो-



कांची एक मोठी सभा मिळविली आणि त्या पुस्तकांतील सर्व गोष्टी त्यांच्या पुढें वांचून दाखविल्या; आणि सर्व लोकांच्या वांटचा होऊन राजाने परमेश्वरापुढें करार केला. त्याने बेथेल एथील स्थंडिल मोडलें आणि कबरींतील हाडें आणवून त्या स्थंडिलावर जाळिलीं. त्याप्रमाणें येरोबोआमाच्या वेळीं भविष्यवाद्याने जें सांगितलें होतें, तें पूर्ण झालें.

परंतु जेव्हां योशिया मरण पावला, तेव्हां सुधारणूकेचें काम बंद झालें. थोड्या दिवसांनी त्याचे दोघे पुत्र आणि त्याचे दोघे नातू हे एका मागून एक असे यरूशालेमाच्या गादीवर बसले; परंतु ते चवघेहि पदच्युत झाले आणि जीं चिन्हें त्यावेळेस दृष्टीस पडत, त्यांवरून स्पष्ट दिसे कीं, न्यायाचा वेळ जवळ आला.

---

## गोष्ट ६०. भविष्यवादी.

त्या चिन्हाचे भाकणारे व अर्थ सांगणारे भविष्यवादी होते. त्यानीं लोकांस जे उपदेश केले ते बहुतेक धर्म-पुस्तकांत मिळतात. लोकांमध्यें ईश्वरसंबंधीं ज्ञानाचा प्रसार करण्याचें व दुष्टाईचा निषेध बंद करण्याचें त्यांचें काम होतें. देवाने अस्या प्रकारचे भविष्यवादी दाहा कुळांच्या राज्यांत आणि यहुदा देशांत उत्पन्न केले. यशाया आणि दानिएल हे राजवंशांतले होते. इर्मेया आणि येहेज्केएल हे उपाध्याच्या वर्गांतले होते. एलीया, अलीशा, योना आणि मिखा हे मध्यम प्रतीच्या लोकांतले होते. आमोसहा गुराख्या होता.

ज्या वेळीं बाबेलचें राज्य केवळ लहान व अल्पप्रभाव होतें, तेव्हां यशाया भविष्यवाद्याने त्याच्या चढत्या भरभराटीचें आणि जयाचें भविष्य सांगितलें आणि ज्या राजाकडून तें जिंकलें जाईल त्याचें नावहि सांगितलें.

खाल्डी लोकांकडून यरूशालेमाचा नाश होईल, हें इर्मेयाने पूर्वीं सांगितलें आणि तें किती वर्षेपर्यंत ओस पडेल, त्याचेंहि भाकीत केलें. जो पुढें गजब होणार तो लोकानीं सुधारून चुकवावा ह्मणून तो सांगत असे.

अर्मेनिया प्रांतांत जे देशपार केलेले इस्राएली लोक होते, त्यांजपासीं इझिकियलने भविष्यें सांगितलीं. ते लोक त्यावेळीं स्वदेशांतून शंभर वर्षेपर्यंत हाकून लाविले होते. ते यहुदी लोकांप्रमाणेच ईश्वरी कोपाने बाबेल राज्याचा नाश व्हावा ह्मणून वाट पाहत होते. इझिकियलने त्यांस सांगितलें कीं, "इस्राएलाच्या मुक्ततेविषयीं यावेळीं आशा करूं नका; पण बाकीचे सर्व लोकहि तुमच्या मागून

देशपार केले जातील." परंतु जसा यहूद्यांतील लोकानी यरेमियाच्या भाषणावर क्वचितच विश्वास ठेविला त्याप्रमाणें इस्राएल लोकानी केलें.

जे शब्दालंकार ते भविष्यवादी बोलत, ते चमत्कारीक आहेत. यरेमिया भविष्यवेत्त्याच्या पुस्तकांत वारंवार एका कुंभाराविषयीं भाषण अढळतें. तो असें ह्मणतो कीं, "मी एका कुंभाराच्या घरीं गेलों, आणि पाहा, त्याने चाकावर काम केलें आणि जें मातीचें भांडें त्यानें केलें, तें त्याच्या हातांत बिघडलें; ह्मणून त्या कुंभारानें त्याचें आपल्या आवडीसारिखें पुनः एक भांडें केलें. हे इस्राएल लोकहो, परमेश्वर बोलतो या कुंभाराप्रमाणें माझ्याने तुह्मासीं करवणार नाहीं कीं काय? पाहा, जसी कुंभाराच्या हातांत माती, तसे माझ्या हातांत तुह्मी आहां." दुसऱ्या एका वेळीं त्याने कुंभाराकडून एक मातीचें भांडें विकत घेतलें. आणि इस्राएलांच्या वडिलांच्या समक्ष त्याने हे शब्द बोलून भूमीवर टाकून त्याचे तुकडे तुकडे केलेः "परमेश्वर असें ह्मणतो कीं, ज्याप्रमाणें कोणी कुंभाराचें भांडें फोडितो आणि तें पुनः नीट होत नाहीं, त्याप्रमाणें मी हे लोक आणि हें नगर यांला करीन. आणि यहूद्याच्या राजांचीं घरें अपवित्र केलीं जातील. कां तर घराच्या छपऱ्यावर त्यानी अन्य देवासाठीं धूप जाळिला त्या कारणावरून."

परंतु सर्व भविष्यकथनांत मुख्य गोष्ट तारणाऱ्याच्या येण्याविषयीं होती. "त्याजविषयीं सर्व भविष्यवादी साक्षी देतात." त्याविषयीं असें भाषित केलें होतें कीं, "तो दाविदाच्या वंशांतला व्हावा." आणि तो देव व मनुष्य

होईल, असें स्पष्ट उघडें केलें होतें. त्यास पराक्रमी देव, अक्षय पिता, शांतता करणारा, आमचा पुण्यप्रभू असीं नावें दिल्हीं होतीं. आह्माबरोबर देव आहे असें ह्मटलेंहोतें; त्यास ईश्वराचे गुण असें ह्मटलें होतें. यशाया भविष्यवाद्याने त्यास मानवी रूप धारण करून ईश्वरी सत्ता चालवितांना दृष्टांतामध्यें पाहिलें आणि त्याविषयीं असें लिहिलें कीं, "उंच स्थानी ठेवलेल्या सिंव्हासनावर बसलेला, असा मी प्रभु पाहिला. त्याच्या भोवतालें सराफिम या नावाचे ईश्वरीदूत उभे होते. त्या प्रत्येकास साहा साहा पक्ष होते; व त्यांतून प्रत्येक दोन पक्षानीं मुख आणि दोहोनीं पाय, आछादन करी; आणि दोहोनी उडून जात असे. ते परस्परास उत्तर देऊन ह्मणत कीं, "सैन्याचा जो प्रभु, तो पवित्र पवित्र पवित्र आहे. आणि सर्व पृथ्वी त्याच्या गौरवाने पूर्ण आहे."

अणखी मशीहाविषयीं असें भविष्य केलें होतें कीं, तो बेथलेहेमांत जन्मेल आणि तो दयेचे व परोपकाराचे चमत्कार करील. आंधळ्याचे नेत्र व बहिऱ्याचे कान उघडील. लंगड्या मनुष्यास हरणाप्रमाणें उड्या मारायास लावील आणि मुक्याची जिव्हा गायन करायास लावील. अणखी त्याविषयीं असें भाकित केलें कीं, "तो लोकांस शुभवर्त्तमान सांगेल आणि जे भग्नहृदयाचे असतील त्यांचें शांतवन करील. तो आपला कळप मेंढपाळाप्रमाणें चारील, आणि आपल्या हाताने कोंकरें जमवील, आणि आपल्या वक्षस्थळांत त्यांस वागवील." त्याच्या दुःख भोगण्याविषयीं व मरण्याविषयीं जीं भविष्यें सांगितलीं, तीं इतकीं स्पष्ट व पूर्ण आहेत कीं तीं वाचूं

लागलें असतां असें वाटतें कीं, आपण पुढें होणार गोष्टी वाचीत नाहीं; पण एखाद्या झालेल्या कथांचा इतिहास वाचीत आहों. अणखी या पवित्र व कृपाळू पुरुषाविषयीं असें भविष्य केलें होतें कीं, शोकाचा व दुःखाचा मनुष्य होईल. आणि तो आमच्या अपराधांकरितां जखमी केला जाईल, आणि आमच्या पापास्तव मर्दिला जाईल. तो आपला आत्मा मृत्यूंत टाकील. तो अपराध्यांबरोबर मोजला जाईल. तो पुष्कळांचीं पापें सोसील, आणि पाप्याकरितां मध्यस्थी करील. त्याने कोणत्या प्रकारें दुःख भोगावें, याचें भविष्यवर्णन असें केलें आहे, "तो खाटक्यापुढें मेंढरांप्रमाणें आणिला आहे; आणि जसी मेंढी आपल्या कातरणाऱ्यांपुढें मुकी असती तसें त्याने आपलें तोंड उघडिलें नाहीं." त्याचें मरण, पुरणें, त्याचें पुनरुत्थान आणि स्वर्गारोहण, यासंबंधी गोष्टी उघड दाखविल्या होत्या, आणि शेवटीं त्याच्या दुःखाचे आनंदकारक परिणाम व फळें, हीं भविष्यरूपाने कथन केलीं होतीं व पवित्र आत्म्याचा वर मिळेल, असें वचन दिल्हें होतें. आणि पुढें जसा समुद्र पाण्याने आच्छादित आहे, त्याप्रमाणें ज्या वेळीं ही पृथ्वी ईश्वरी ज्ञानाने पूर्ण होईल असा सुखी काळ येईल ह्मणून भविष्य केलें होतें.

याप्रमाणें मनुष्यांच्या न्यूनता आणि दुःखें, यांजबरोबर पाऊल टाकीत जो तारणोपाय चालला होता, त्याजवर देवाने अधिक उजेड पाडला. आणि याप्रकारें त्याचे भाविक लोक शांति पावून आपल्या विश्वासांत दृढ होत गेले. आणि दुष्ट व अभाविक लोकांस कांहींच क्षम मिळाली नाहीं.

———

## गोष्ट ६१. बाबेल देशांतील दासपण.

भविष्यवाद्याने ज्या सर्व गोष्टी सांगितल्या होत्या, त्यांजवर त्यावेळीं यहूद्यानी विश्वास ठेविला असो किंवा नसो; परंतु त्यांस त्यावेळीं असी प्रतीति आली कीं, त्यांतील एकहि गोष्ट खोटी झाली नाहीं. खालडी जे क्रूर लोक ते येऊन त्यांच्या विध्वंसक हाताखालीं सुंदर यरूशालेम शहराचा नाश झाला. तथापि देवाने सांगितलेलें शासन एकाएकीं झालें नाहीं. खालडी लोकांचा राजा नेबुखाद्नेज्जार याने प्रथम यहूदा देशावर खंडणी बसविली, आणि यहोयाकिम यास व लोकांतील मुख्य लढवाई मनुष्यें दाहा हजार आणि सर्व धातूचे कामकरणारे आणि कारागीर यांस बाबेल देशास नेलें. आणि त्याने यहूद्यावर दुसरा राजा केला. मग तें राज्य दाहा वर्षेंपर्यंत चाललें. खालडी लोकांच्या विरुद्ध येदकिया याने मिसर लोकांपासून पुस्त व आश्रा मिळविला. परंतु खालडी लोकांची फौज नदीच्या पुराप्रमाणें त्याच्या देशावर आली. यहूदी लोकानी दोन वर्षेंपर्यंत आपल्या शहराचें रक्षण केलें. ज्यावेळीं शहरास वेढा होता, तेव्हां आंत असा दुकाळ पडला कीं अन्नाकरितां आयानी आपलीं पोटचीं मुलें देखील चिरलीं. शेवटीं शत्रूने बलात्काराने आंत प्रवेश केला. येदकिया हा पळत असतां शत्रूच्या हातीं सांपडला. आणि येज्केएल याने जें त्याजविषयीं भविष्य केलें होतें, तें पूर्ण झालें; तें असें कीं, त्याच्या दृष्टीस तो देश पडणार नाहीं तथापि तो तेथें मरेल; खालदी लोकानीं त्याचे डोळे काढून त्याला बाबेलास नेलें. त्यापूर्वीं

त्याने आपल्या पुत्रांचा वध पाहिला. त्या लोकांनीं यरूशालेम शहर लुटून जाळून टाकिलें आणि देवळांतील मोलवान पात्रें व भांडीं बाबेलांत नेऊन बेल देवाच्या देवळांत ठेविलीं. आणि ज्या कित्येक थोर मनुष्यांवर नेबुखाद्नेज्जार याचा भरवंसा होता व जे अतिशय दरिद्री होते, ते खेरीज करून बाकी सर्व लोकांस त्याने तेथून नेऊन बाबेल राज्याच्या निरनिराळ्या भागांत ठेविलें. आणि जसें भविष्यवाद्यानीं ह्मटलें होतें, तसे ते वाऱ्यापुढें सडाप्रमाणें चहूंकडे पसरले गेले.

जे मनुष्य यरूशालेमांत राहिले होते, त्यांतून मुख्य गेदालिया यास राजाने यहूद्याचा सुभेदार केला. परंतु यहूदी लोकानीं या विश्वासू माणसास ठार मारिलें. येरेमिया जो भविष्यवादी याने आपल्या देशांत राहण्याकरितां राजापासून परवानगी मागितली आणि यरूशालेमाच्या विध्वंसांत राहून तेथें आपलें विलापरूप पुस्तक लिहिलें.

---

## गोष्ट ६२. इब्री लोकांचे मुलगे.

यहूदी लोक शत्रूच्या देशांत असतां अगदी नीच व क्लेषींत अवस्थेंत पडले, त्यांस कांहींच मोकळीक नाहीं, असें आपण मानूं नये. ईश्वरास आपल्या क्रोधांत दया उत्पन्न झाली, आणि ज्यानीं त्यांस पाडाव करून नेलें होतें, त्यांजकडून त्यांचीं दया करविली. त्यांतून कित्येक मोठ्या पदवीस चढण्याजोगे झाले; तथापि जे धार्मिक यहूदी होते, त्यांच्याने आपली भूमी आपलें जें नाशाप्रत झालें आवडतें यरूशालेम आणि तेजस्वी देऊळ

तें विसरवली नाहीं. आणि त्यांच्या शत्रूने जेव्हां त्यास एक गीत ह्मणायास सांगितलें, तेव्हां त्यांचें खेदकारक उत्तर असें होतें कीं, "परदेशांमध्यें आह्मी प्रभूचे गीत कसें गावें?" आणि ते ह्मणाले कीं, "हे यरूशालेमा, मी जर तुला विसरलों, तर माझ्या उजव्या हाताची युक्ति विसरून जावी. जर मी तुला स्मरत नाहीं, जर मी आपल्या मुख्य हर्षावरती यरूशालेम उंचावीत नाहीं, तर माझ्या टाळ्यास माझी जिव्हा चिकटो." ज्या कित्येक मुलांस नेबुखाद्नेज्जार याने विद्येंत शिक्षित करून वाढविलें होतें, त्यांत दानिएल, शद्राख, मेशाख व आबेदनिगो, हे होते. त्यांस राजाने मोठ्या पदवीस व अन्नूस चढविलें. तेणेंकरून ते आपल्या स्वदेशीय लोकांचें कल्याण करायास आणि विधर्मी लोकांत ईश्वरी ज्ञानाचा प्रकाश पाडायास समर्थ झाले. परंतु प्रथम त्यांस दुःसह कसोटीस उतरावें लागलें.

नेबुखाद्नेज्जार याच्या अन्नांतलें जें अन्न त्यांस पाठविलें जाई, तें खाण्यांत पाप आहे असें वाटलें. आणि त्यांजवर जो देखरेख करणारा होता, त्यास त्यानी विनंती केली कीं, "आह्मास त्या अन्नाबद्दल डाल अथवा भाजी आणि द्राक्षरसाबद्दल पाणी प्यावयास द्यावें." असें केल्यानंतर ईश्वराने त्यांजवर कृपा केली, आणि तेणेंकरून ते इतरांपेक्षां अधिक पुष्ट आणि सुंदर झाले. आणि जेव्हां त्यांस राजापुढें उभें करण्याचा वेळ आला, तेव्हां बुद्धि आणि ज्ञान यांत त्यांची बरोबरी करण्यास दुसरा कोणी नव्हता.

नेबुखाद्नेज्जार राजाने पुष्कळ देशांतून जी लूट जमा

करून आणिली होती, तींतून त्याने एक साठ हात उंचाची सुवर्णाची मूर्त्ती करविली. या मूर्त्तीची अर्चा करिते वेळीं त्याचे मोठमोठाले सरदार, पराक्रमी मनुष्यें जमलीं होतीं. तेव्हां दांडोरा पिटणारा ओरडून ह्मणाला कीं, "अहो लोकानो, जातीनो, आणि भाषानो, तुह्माला आज्ञा केली आहे कीं, ज्या वेळेस तुह्मी करणा, बांसरी, चंग, अलगुजें, विणा, तंबुरा यांचा शब्द आणि सर्व प्रकाराचें वादन ऐकाल, तेव्हां तुह्मी पायां पडावें आणि जी सुवर्णाची मूर्त्ती नेबुखाद्नेज्जाराने स्थापिली आहे, तिजला भजावें; आणि जो कोणी पायां पडत नाहीं आणि भजन करीत नाहीं, तो त्याच घटिकेस जळत अग्नीच्या भट्टीमध्यें टाकिला जाईल." शद्राख, मेशाख आणि आबेदनिगो, हे अधिकारी होते ह्मणून त्या समारंभांत त्यांस येण्यास अगत्य होतें. आणि जेव्हां तें कर्म होऊन गेलें तेव्हां कोणी त्यांजवर राजाजवळ असा दोष आणिला कीं, "सर्व लोक मूर्त्तीच्या पायां पडत असतां हे तिघे मात्र उभे होते." हें नेबुखाद्नेज्जाराने ऐकून त्यांस आपल्या समोर आणायाची आज्ञा दिल्ही. आणि त्यांस ह्मणाला, "हे शद्राख, मेशाख, व आबेदनेगो, तुह्मी माझ्या देवास किंवा मी जी सुवर्ण मूर्त्ती स्थापिली आहे, तिला भजत नाहीं, हें खरें किंवा कसें? माझ्या हातून तुह्माला मुक्त करील, असा देव तो कोण आहे?" तेव्हां ते असें ह्मणाले कीं, "ज्या देवास आह्मी भजतों, तो ज्वलदग्नीच्या भट्टीपासून आह्मास रक्षायास समर्थ आहे. आणि हे राजा, तो आह्मास तुझ्या हातांतून मुक्त करील. आणि जरी त्याने आह्मास रक्षिलें नाहीं, तरी हे राजा, तूं जाण कीं, आह्मी तुझ्या देवाची

सेवा करणार नाहीं, आणि जी सुवर्णाची मूर्त्ति त्वां स्थापिली आहेस, तिला आह्मी भजणार नाहीं."

तेव्हां नेबुखाद्नेज्जार कोपाने भरला आणि आज्ञा केली कीं, "जितकी भट्टी तापत असती तिजपेक्षां सातपट अधिक तापवावी." नंतर ह्या तीन मनुष्यांस त्यांचे आंगरखे, पागोटीं, मोजे आणि त्यांचीं दुसरीं वस्त्रें यांत गुंडाळून ज्वलदग्नीच्या भट्टींत टाकिलें. आणि तो अग्नी इतका भडाक्याने जळत होता कीं ज्या मनुष्यानी त्यांस भट्टींत टाकिलें, ते त्या ज्वाळेने जळून गेले. आणि हे गुंडाळलेले तिघे भट्टीमध्यें पडले.

नंतर राजा विस्मित होऊन उठला आणि आपल्या मंत्र्यांस ह्मणाला कीं, "तीन पुरूषांस बांधून आपण भट्टींत टाकिलें नाहीं कीं काय? पाहा, चौघे पुरुष



अग्नीमध्यें मोकळे फिरता तसें मला दिसतें. आणि यांना कांहीं दुःख झालें नाहीं. आणि चौथ्याचें रूप देवपुत्रासारिखें दिसतें."

नंतर नेबुखाद्नेज्झार त्या ज्वलदग्नीच्या भट्टीच्या तोंडासीं येऊन ह्मणाला कीं, "हे शाद्राख, मेशख व आबेद्नेगो हे परात्पर परमेश्वराचे शेवकहो, तुह्मी निघून इकडे या." नंतर ते बाहेर आले. आणि त्यांच्या मस्तकाचा एक केशहि जळाला नव्हता, किंवा त्यांच्या वस्त्राचा रंग पालटला नव्हता, व त्यांच्या अंगावर अग्नीचा वासहि नव्हता. मग नेबुखाद्नेज्झार ह्मणाला, "शद्राख, मेशाख व अबेद्नेगो, यांचें ज्या देवाने आपला दूत पाठवून आपल्या ज्या सेवकानी त्याजवर भाव ठेविला, त्यांचें रक्षण केलें आहे तो सुवंदित असो." नंतर राजाने त्या तिघां पुरूषांस आपल्या राज्यामध्यें मोठे अधिकार दिल्हे.

---

## गोष्ट ६३. दानिएल.

नेबुखाद्नेज्झाराने जितका मोठा मान दानिएलास दिल्हा होता; त्यापेक्षां त्याच्या मागून झाला जो बेलशाज्झार याने त्यास अधिक मोठ्या पदवीस चढविलें; परंतु सर्वांपेक्षां मोठें पद त्यास दारयावेश जो मेदी याने दिल्हें. त्याने त्यास राज्यांतील तिसरा अधिकारी केला. आणि त्याला सर्व राज्यावर स्थापावें असें त्याच्या मनांत होतें. दानिएलाचा उत्कर्ष पाहून सरदार लोकांस इतकें वाईट वाटलें कीं, ते असूयाने त्याच्या नाशास प्रवर्तूं लागले; परंतु तो आपल्या देवाचे नियम पाळीत आहे, याशिवाय दुसऱ्या कोणत्याहि गोष्टींत त्यांच्याने त्याजवर दोष आणविला नाहीं. यास्तव त्याच्या शत्रूंनी राज्या-

च्या मनांत असा एक हुकूम करण्याचें भरवून दिल्हा कीं, जो कोणी तीस दिवसपर्यंत राजावांचून कोणत्याहि देवाजवळ किंवा मनुष्याजवळ विनंती करील, तो सिंहाच्या गुहेंत टाकिला जाईल. परंतु दानिएल आपल्या नित्य नियमाने आपल्या कोठडीच्या खिडक्या यरूशालेमाकडे उघडून दररोज तीनबेळा प्रार्थना करीत गेला. तेव्हां त्याच्या शत्रूनी एकत्र जमून दानिएलास आपल्या देवाची प्रार्थना व विनंती करितांना पाहिलें आणि तत्क्षणींच त्यांनी तें राजास निवेदन केलें.

तेव्हां राजाने त्यास आनंदाने मुक्त केलें असतें; परंतु त्याने जो हुकूम केला होता, त्याजमुळें दानिएलाच्या शत्रूनी त्यास सिंहाच्या गुहेंत टाकण्यास राजाच्या मनांत भरविण्याविषयीं प्रयत्न केले, व त्यांचे प्रयत्न सफळ झाले. तेव्हां राजा त्यास ह्मणाला कीं, "ज्या देवाची तूं सर्वकाळ सेवा करितोस, तो तुला मुक्त करील." नंतर राजाने आपल्या मुद्रेने गुहेचें द्वार मुद्रित केलें. आणि तो आपल्या मंदिरांत गेला; परंतु रात्रभर त्याला झोंप लागली नाहीं. नंतर मोठ्या प्रातःकाळीं उठून त्वरेने गुहेच्या द्वारापासीं गेला, आणि आक्रंदित स्वराने ह्मणाला, "हे जिवंत देवाच्या सेवका दानिएला, ज्या देवास तूं नित्य सेवितोस, तो तुझें सिंव्हापासून रक्षण करण्यास समर्थ आहे कीं काय ?" दानिएलाने आंतून उत्तर दिल्हें कीं, "माझ्या ईश्वराने दूत पाठवून सिंहाचीं तोंडें बंद केलीं आहेत." तेव्हां राजा अतिशय आनंदित झाला आणि दानिएलास गुहेच्या बाहेर काढण्याची आज्ञा दिल्ही आणि ज्या मनुष्यानी त्याजवर दोष ठेविला हो-

ता त्यांस आंत टाकण्यास सांगितलें. आणि ते गुहेच्या तळास पोहंचल्यापूर्वीं सिंहांनी त्यांचे फाडून तुकडे तुकडे केले.



नंतर राजानें असा हुकूम केला कीं, "माझ्या सर्व राज्यांतील मनुष्यांनीं दानिएलाच्या देवासमोर कांपत आणि भय धरीत जावें; कां कीं तो जिवंत देव आहे आणि चिरकाळ स्थिरात्मा आहे. त्याच्या राज्याचा कधीं लय होणार नाहीं, तें शेवटपर्यंत टिकेल. तो मुक्त करितो आणि सोडवितो व आकाशांत व पृथ्वींत उत्पात व आश्चर्यकारक कृत्यें करितो; त्यानें दानिएलाला सिंहांपासून मुक्त केलें आहे."

---

## गोष्ट ६४. यरूशालेमाचें पुन्हा बांधणें.

यरूशालेम शहराचा विध्वंस झाल्यानंतर सत्तर वर्षांनीं पारशी देशचा सैरस (अथवा कुरस) नामक राजा आश्शुरिया, मेदिया आणि बाबेल या देशांवर राज्य करूं लागला. त्याने आपल्या राज्याच्या पहिल्याच वर्षीं असी जाहिरात लाविली कीं, “या राज्यांत जे इस्राएल लोक राहत आहेत, त्यांनी स्वदेशास जावें, आणि आपलें नगर व देऊळ बांधावें.” त्या जाहीरनाम्यांत असें लिहिलें होतें कीं, “आकाशांतील परमेश्वर जो देव त्याने यहूद्यांत जें यरूशालेम आहे तेथें आपणाकरितां देऊळ बांधण्यास मला सांगितलें आहे. त्याच्या सर्व लोकांपैकीं तुह्मामध्यें कोण कोण आहेत ? त्यांचा देव त्यांजबरोबर असो, आणि त्यांस यरूशालेमास जाऊं द्या आणि इस्राएलांचा प्रभु जो देव त्याचें घर बांधू द्या.” आणि पूर्वींच्या देवळांतून जीं पांच हजार चारशें सुवर्णपात्रें व भांडीं बाबेलास आणिलीं होतीं, तींहि त्याने त्यांस परत दिलीं.

जे कोणी यरूशालेमास विसरले नव्हते, ते हें ऐकतांच आपल्या देशांत परत जाण्यास निघाले; परंतु पुष्कळ यहूदी व इस्राएल लोक आश्शुरियांत व बाबेलांत घर संसार करून राहिले होते आणि त्यांतील बहुतेक संपत्तिवान झाले होते. येशहुआ जो मुख्य याजक आणि दावीदाच्या वंशांतला एक जरूबाबेल या दोघांच्या हाताखालीं जे लोक यरूशालेमास परत गेले, त्यांची संख्या बेचाळीस हजार कुटुंबें होतीं.

ते तेथें गेल्यावर प्रथम त्यानी देवाकरितां पुनः यज्ञवेदी बांधण्यास आणि प्रभूच्या मंदिराचा पाया घालण्यास काम चालविलें. त्या वेळेस परमेश्वराची स्तुति करण्यास उपाध्ये करणे घेऊन उभे राहिले. आणि जेव्हां त्यानी परमेश्वरास स्तविलें, तेव्हां सर्व लोकानी जयजय शब्दानी घोषण केलें, कारण कीं परमेश्वराच्या नव्या घराचा पाया घातला. परंतु त्यांतील पुष्कळ वृद्ध मनुष्यें ज्यानी पूर्वीचें घर पाहिलें होतें, त्यांस या नव्या घराचा लहानसा आरंभ पाहून रडूं आलें.

तें काम चालवितानां त्यांस ज्या पुष्कळ अडचणी भोगाव्या लागल्या, त्यांत हग्गाई व जेखार्या यानी आपल्या मसलतीने व धीराने त्यांस पुष्कळ मदत केली दारयावेश याने एज्रा जो लेखक यास यरूशालेमास पाठविलें. त्याने बाबेलांत जीं पात्रें राहिलीं होतीं, तीं आपल्या बरोबर नेलीं. आणि त्याने तेथें ईश्वराची पूजा व उपाध्ये मंडळी आणि जनव्यवहार संबंधीं नियम जे त्यांच्या वडिलांत चालले होते, ते स्थापिले. यानंतर अर्ताहशूश्ते याने नेहेम्या जो त्याचा पेला धरणारा आणि सेवक होता त्याच्या विनंतीवरून यरूशालेमाच्या पडलेल्या भिंती बांधण्याकरितां पाठविलें. कारण कीं, जरी ईश्वरमंदिर व पुष्कळ घरें पुनः बांधलीं गेलीं तथापि शहरास भिंतीचें रक्षण नव्हतें.

तें देऊळ बांधण्यांत शोमरोनी लोक मिळायास इच्छित होते; परंतु यहूद्यानी त्यांचें साह्य घेतलें नाहीं; ह्मणून त्यानी आपल्या शक्तींत होतें तितकें त्यांच्या कामास प्रतिबंध केले, आणि राजाजवळ त्यांच्यावर खोटे दोषारोप

आणिले. आणि त्यांच्या कामावर फौज घेऊन हल्लाहि केला. तेणेकरून तें काम चालवितांना अर्धे मनुष्यांस आपल्या हातांत शस्त्रें घेऊन उभें राहावें लागत असे; आणि जे लोक काम करीत, तेहि कंबरेस तरवारी बांधून हातांत हातेरे घेऊन काम करीत.

पारसी देशचे बहुतेक राजे यहूदी लोकांस अनुकूळ होते. त्यांतून एकाने यहूदी लोकांतील एस्थेर या नावाची एक कुमारीसीं लग्न केलें. आणि तिच्या योगाने पारसी राज्यांत यहूदी लोकांचें फार हीत झालें. राजास मारण्याची जी मसलत केली ती मोरदिकाई जो एस्थेराचा चुलता याने शोध लावून राणीस कळविलें. त्य



वेळीं त्याची विशेष खबर घेतली नाहीं. तें वर्त्तमान राज्याच्या कालानुक्रम वृत्तांतांत लिहून मात्र ठेविलें; परंतु कांहीं दिवसाने राजाने मोरदिकाई यास पारसी राज्याचा मुख्य प्रधान केला. तेणेकरून यहूदी लोकांस मोठा फायदा झाला.

जोंपर्यंत नेहेम्या हा यरूशालेमाचा सुभेदार होता तोंपर्यंत त्याने कांहीं वेतन घेतलें नाहीं. असें असतां दीडशें पाहुणे नित्य त्याच्या पंक्तीस जेवींत असत. जे संकटांत असत त्यांस तो आपल्या शक्तीप्रमाणें देणग्या व पैका उसणा देऊन त्यांचें दुःख निवारण करीत असे. तो कोणत्याहि मेहनतीच्या कामापासून किंवा दुःखापासून निराळा राहिला नाहीं. यरूशालेमाच्या भिंती बांधण्यांत इतर लोकांबरोबर त्याच्या चाकरानीं काम केलें. अधिकारी व द्रव्यवान लोक यानी गरीब लोकांकडून जो माल गहाण घेतला होता, तो त्यांस परत देऊन त्यांस त्याला मुक्त करायास त्याने आपल्या स्वताच्या आचरणाने ऋणांच्या मनांत भरविलें.

यहूदी लोकांची जी अल्पकालीक सुधारणूक झाली, तींत अशा प्रकारचे पुरूष त्यांस फार उपयोगी पडले; परंतु जो खरा उद्धारणारा त्याविषयीं परमेश्वराने मलाखी भविष्यवाद्याच्या द्वारें असें ह्मटलें कीं, “पाहा, मी आपला दूत पाठवीन आणि तो मजपुढें मार्ग सिद्ध करील. आणि ज्या प्रभूस तुह्मी शोधितां व ज्या संधेच्या दूताविषयीं तुह्मी संतोषतां तो आपल्या मंदिरांत अकस्मात् येईल. पाहा, तो येईलच येईल. असें सैन्याचा ईश्वर ह्मणतो.”

---

## ग्रंथशेष.

देऊळाचें पुनः बांधणें यापासून येशूच्या प्रगट होण्यापर्यंत ४८३ वर्षं होऊन जाणार असें दानिएलाच्या भविष्य ग्रंथामध्यें लिहून ठेविलें होतें. त्या समयीं यहुदी लो-

कांच्या कार्यांत पुष्कळ पालट झाले कधीं आबादानी कधीं अकल्याण, असें होतें.

आलेक्जान्दर जो ग्रीकलोकांचा बादशाहा, तो पारसी लोकांस जिंकल्यानंतर, आपल्या फौजेसुद्धां यहूदी देशांत गेला. त्याने यरूशालेमास येऊन तेथील देऊळ याचा आणि खऱ्या देवाचे उपाध्ये यांचा फार मान धरिला, आणि लोकांसीं बहुत कृपेने वर्त्तले ह्मणून त्याच्या सरदारांला फार आश्चर्य वाटलें. तो मेल्यानंतर त्पोलमी जो त्याचा एक सरदार त्याने मिसर देशाचा राजा होऊन यहूदी देश आपल्या स्वाधीन घेतला, व हजारों यहूदी माणसांस पाडाव करून मिसर देशांत नेलें. मग त्याचा पुत्र याने राजा होऊन यहूदी लोकांस मोठी कृपा दाखविली, आणि त्यांजवळ जें देवाने दिल्हेलें शास्त्र, त्याचा तरजमा ग्रीक भाषेमध्यें करविला.

यहूदी लोक शंभर वर्षें मिसरी राज्यांच्या स्वाधीन राहिले आहेत; मग आंतिओकस जो सुरिया देशाचा राजा, त्याच्या स्वाधीन ते झाले आहेत. त्या राजाने मोहन घालण्याकडून नाहीं तर भय दाखविण्याकडून बहुत यहूद्यांस मूर्त्तिपूजेंत आणिलें. तथापि फारकरून ते अगदीं नाकबूल होऊन मूर्त्तिपूजा केल्यापेक्षां आह्मी आवडीने मरण पावूं असें त्यानी दाखविलें; आणि गौरवयुक्त पुनरुत्थान मिळेल असी आशा धरून त्यांतील बहुत मरण पावले आहेत.

त्यावेळेस यहूदी लोकांत माक्काबी ह्मणून एक कूळ होतें तें फार नामांकित झालें. त्याने आपल्या देशांत जी परक्यांची सत्ता चालत होती, ती मोडून टाकली

पण लोकाच्याने फार दिवस स्वतंत्रपणें वागविलें नाहीं. रोमी लोक येऊन आपला अधिकार चालवूं लागले; खंडणी द्यावी ह्मणून त्यानी यहूद्यांस सांगितलें, आणि देशावर एक सुभेदार नेमून ठेविला. जो नेमिला तो हेरोद, इदुमी देशचा माणूस त्याला राजा असें नाव होतें खरें; परंतु तो रोमी सरकारचा आज्ञांकित होता. त्याला मोठें चातुर्य व धमक होती; तथापि तो पराकाष्ठेचा क्रूर व जुलुमी असा होता. आपणावर परका मनुष्य राज्य करीत आहे, व आपल्यापासून सत्ता गेली, हें पाहून यहूदी लोकांस अतिशय दुःख वाटलें. असें असतांहि त्याला समजलें कीं लोकाच्या तारणासाठीं जो जगांत येणार, तो लवकर येत असेल.

मालाखी मरून गेल्यानंतर येशूच्या जन्मापर्यंत कोणी भविष्यवादी यहूदी लोकांत दिसला नाहीं ह्मणून ज्याजविषयीं वचनें दिल्हीं होतीं, दाविदाच्या वंशाचा ईश्वराने अभिषिक्त केलेला, दाविदाचे राजासन फिरून स्थापणार, असा जो तारणारा त्याची वाट ते अधिक आग्रहाने पाहत असत. आणि त्यांच्या मनांत असें होतें कीं तो येऊन रोमी लोकांस देशापासून घालवील. शास्त्रांत बरोबर लक्ष न लावितां, त्यानी त्या होणार तारणाराविषयीं पुष्कळ गैरसमजुती धरिल्या. प्रकाशित असें कोणी कोणी होते, ते पवित्र मनाने त्याची आशा धरीत होते.

---

